

नोंदणी क्र. एफ.१६०१४(मुंबई)








महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १४ वें ] डिसेंबर १९६० [ अंक ३


| | |
|---|---|
| सार-संकलन . . . . . . . . | |
| ब्रह्मीभूत स्वामी केवलानन्द सरस्वती | राष्ट्रीय प्राचार्य श्री. पांडुरंग वामन काणे |
| श्री केवलानंद स्वामी यांचे वेदान्त-विचार . | श्री. महादेवशास्त्री दिवेकर |
| ज्ञानेश्वरीविषयक अवशिष्ट संशोधन . . . | श्री. द. वें. केतकर |
| महाभारत . . | प्रा. ना. ज. शेंडे |
| केनेडी यांच्या विजयाच्या निमित्ताने . . | श्री. भा. कृ. देसाई |
| टॉल्स्टॉयचा साहित्य-संसार . . . . | प्रा. ग. प्र. प्रधान् |
| उच्च शिक्षण आणि स्वतंत्र ( External) परीक्षा . | एक शिक्षणचिकित्सु |
| एका अनामिक कवीचें द्रौपदीस्वयंवर . . | श्री. ज. शा. देशपांडे |
| मास्को-दर्शन . . . . | श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी |

– वाचकांचा-पत्रव्यवहार –


वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.









अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष चौदावें
अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर
१९६०

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक

| | | |
|---|---|---|
| सार–संकलन | | १–१० |
| ब्रह्मीभूत स्वामी केवलानन्द सरस्वती | राष्ट्रीय प्राचार्य श्री. पांडुरंग वामन काणे | ११–१४ |
| श्री केवलानंद स्वामी यांचे वेदान्त विचार | श्री. महादेवशास्त्री दिवेकर | १५–१७ |
| ज्ञानेश्वरीविषयक अवशिष्ट संशोधन | श्री. द. वें. केतकर | १८–३० |
| महाभारत | प्रा. ना. ज. शेंडे | ३१–३७ |
| केनेडी यांच्या विजयाच्या निमित्ताने | श्री. भा. कृ. देसाई | ३८–४१ |
| टॉल्स्टॉयचा साहित्य – संसार | प्रा. ग. प्र. प्रधान | ४२–४७ |
| उच्च शिक्षण आणि स्वतंत्र ( External ) परीक्षा | एक शिक्षणचिकित्सु | ४८–५१ |
| एका अनामिक कवीचें द्रौपदीस्वयंवर | श्री. ज. शा. देशपांडे | ५२–५४ |
| मास्को–दर्शन | श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी | ५५–५९ |
| वाचकांचा पत्रव्यवहार – | | ६०–६६ |

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )









अनुक्रमणिका

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | धर्मकोश- व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी | ... ... ... | ५२-०-० |
| | कापडी बांधणी | ... ... ... | ६४-०-० |
| (२) | धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी | ... ... ... | ११०-०-० |
| | कापडी बांधणी | ... ... ... | १२६-०-० |
| (३) | धर्मकोश- संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५-०-० |
| (४) | मीमांसादर्शन | ... ... ... ... | ३०-०-० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ४ | | १३५-०-० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... ... | ६-०-० |
| (७) | हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ... | ५-०-० |
| (८) | वैदिक संस्कृतीचा विकास | ... .. ... | ६-०-० |
| (९) | नवमानवतावाद | ... ... ... ... | २-८-० |
| (१०) | मानवाचा आदर्श | ... ... ... ... | ३-०-० |
| (११) | चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ... | ३-०-० |
| (१२) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | ... | २-८-० |
| (१३) | छत्रपति संभाजी महाराज ( श्री. वा. सी. बेंद्रे ) | .... | १६-०-० |

अनुक्रमणिका








# सार--संकलन

## संयुक्त राष्ट्रसंघटनेंत क्रुश्चेव

संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या आमसभेंतील सोविएट पंत-प्रधान क्रुश्चेव्ह यांचें वर्तन प्रचारहेतूंनीं प्रेरित झालेलें होतें हें उघड आहे. यासंबंधीची मीमांसा करणारा एक लेख "न्यू लीडर" च्या २६ सप्टेंबरच्या अंकांत श्री. बोरिस निकोलावुस्की यांनीं लिहिला आहे. त्याचा हा सारांश :—

सुमारें एका वर्षाच्या अंतरानें क्रुश्चेव्हनीं अमेरिकेला दोन वेळां भेट दिली. तथापि त्यांच्या गतवर्षीच्या व यंदाच्या भेटींत महत्वाचा फरक आहे. गतवर्षी संयुक्त राष्ट्रसंघटना आपली निःशस्त्रीकरण योजना बहुमतानें मान्य करील व विशेषतः तिला पाश्चात्य राष्ट्रें व त्यांतल्या त्यांत अमेरिका यांची संमति मिळेल अशी त्याची अपेक्षा होती. अमेरिकेशी दीर्घमुदतीचा करार करण्याचा त्याचा हेतु होता. अर्थात् साम्यवाद व पाश्चात्य लोकशाही यांच्यातील स्पर्धेची भावना त्याच्या मनांत होतीच; व या स्पर्धेत साम्यवादाचा विजय व्हावा असाच त्याचा हेतु. परंतु त्याचा दृष्टि-कोण वैचारिक कलहानें प्रेरित झालेला असला तरी कांहीं राजकीय लाभ साधण्यापुरताच तो मर्यादित होता; निःशस्त्रीकरणाची वा सहजीवनाची शक्यता नाहीशी होईल अशा प्रकारें बोलणीं उधळून लाव-ण्याची त्याची तयारी नव्हती. उलट सोविएट नाग-रिकांना व जागतिक साम्यवादाला अमेरिकन जनतेला शांतता हवी आहे अशी ग्वाही तो देत होता; व अमेरिकन जनता व अमेरिकन सरकार यांच्यांत फरक करण्याचेंहि त्यानें नाकारलें होतें. त्यानें कांहीं हातचें राखून ठेवलें नसेल असें नाहीं; पण त्याची शांततामय सहजीवनाची भूमिका प्रामाणिक होती व त्याला अमेरिकेशीं करार हवा होता.

दुसऱ्या भेटीच्या वेळीं ही सर्व परिस्थिति पालटली होती. गेल्या मे महिन्यांतील दुर्दैवी घटनानंतर क्रुश्चे-व्हच्या भूमिकेला अधिकाधिक अमेरिकाविरोधी स्वरूप प्राप्त होऊं लागलें. एकाददुसऱ्या विधानावर लक्ष्य केंद्रित करणें किंवा वैयक्तिक टीकेला महत्त्व देणें चुकीचें आहे. सोविएट धोरणाचा साकल्यानें विचार केल्यास अमेरिकन परराष्ट्रनीतीच्या महत्त्वाच्या बाजूंवर चौफेर हल्ला हेंच स्वरूप त्यानें धारण केल्याचें दिसूं लागलें. स्टालिन कारकीर्दीच्या अखेरच्या काळांतली अमेरिकेस पहिल्या नंबरचा शत्रु म्हणून लेखण्याची प्रवृत्ति तेथें पुनः डोकें वर काढूं लागली. तथापि हें चित्र पूर्वीइतकें साधें व सरळ नव्हतें. चीनशीं झालेल्या मतभेदामुळें त्याला काहींसें गुंतागुंतीचें स्वरूप प्राप्त झालें होतें. देशांतील वाढता अमेरिकाविरोध व चीनशी झालेले मतभेद यांची सांगड घातली जाणें कठिण होतें.

"शांततामय सहजीवना" च्या गरजेचा गजर अजू-नहि चालूं आहे; व युद्ध अटळ नाहीं ही घोषणाहि प्रत्यही होत आहे. या कल्पना सामान्य नागरिकाच्या मनांत खोलवर रुजलेल्या आहेत. त्या चटकन् बाजूस टाकणें कठिण आहे. परंतु त्यांचा अर्थ मात्र तातडीनें बदलला जात आहे. अमरिकन सरकारला युद्ध नको असल्यामुळें शांततामय सहजीवन शक्य आहे असें सोविएट नागरिकाला आतां सांगण्यांत येत नाहीं. अमेरिकन जनतेला युद्ध नको हें देखील क्वचितच म्हटलें जातें. युद्ध टाळतां येईल या विधानाला आतां राजकारणाऐवजीं तंत्रविद्येचा आधार दिला जातो. "सोविएट लष्करी सामर्थ्य इतकें प्रचंड आहे कीं जरूर पडल्यास आपण कोणत्याहि 'आक्रमकाचा धुव्वा उडवूं शकूं,' हा तो आधार होय. व म्हणून 'युद्ध टाळतां येईल" या म्हणण्यांत तथ्य आहे असा प्रचार केला जात आहे. अशाप्रकारें समान दर्जाच्या राष्ट्रांमधील खुषीच्या करारांतून उद्भवणारी सहजीव-नाची कल्पना मागें पडली असून सोविएट अस्त्र-सामर्थ्याच्या जोरावर सक्तीनें राखल्या जाणाऱ्या शांत-तेचा बिचार पुढें येत आहे.

"आक्रमक" कोणास म्हणायचें याची व्याख्याहि अशीच बदलूं लागली आहे. बायकामुलें सुखरूप बाहेर पडेतों ४८ तासपर्यंत कांगोंतून लष्कर हलविण्याचें तहकूब करावें असें म्हणणारा बेल्जियन हा आक्र-मक. जेथें ते कधीहि नव्हते व ज्यांचा तेथें








कांहीहि हक्क नाहीं असा डच् न्यू गिनीचा प्रदेश इंडोनेशियाला कां द्यावा हें समजत नाहीं असें म्हणणारा डच हाहि आक्रमकच. उलट शेंकडों वर्षांपूर्वी, माओचें म्हणणें प्रमाण मानल्यास, तो भाग चिनी साम्राज्याचा भाग होता या सबबीवर भारताचा हजारों चौरस मैल प्रदेश गिळंकृत करणारा चीन मात्र आक्रमक नव्हे. हंगेरींतील सोविएट आक्रमणाविषयीं तर बोलायचेंच कारण नाहीं. उद्यां सोविएट मदतीनें नासेरनें इस्रायल गिळंकृत करायचें म्हटल्यास तोहि आक्रमक ठरण्याचा संभव नाहीं.

युगोस्लावियांतील एडवर्ड कार्देजूशीं झालेल्या वादांत 'प्रवदा' नें स्टालीनप्रणित "न्याय्य" युद्धाच्या कल्पनेचा पुनरुच्चार केला आहे. सोविएट गटांतील कोणत्याहि राष्ट्रानें पुकारलेलें युद्ध हें आक्रमक असूंच शकत नाहीं असा याचा अर्थ आहे. पाश्चात्य लोकशाही हीच काय ती आक्रमक! उद्यां क्रुश्चेव्हच्या परराष्ट्र धोरणाला पाठिंबा देण्याच्या हेतूनें होणारें कोणतेंहि हिंसात्मक कृत्य समर्थनीयच म्हटलें पाहिजे असें मानण्यापर्यंत मजल जायची. उलट चीनच्या आक्रमणाचा अत्यंत शांततामय विरोध —अगदीं गांधीवादाच्या तंत्रानुसार असला तरी— आक्रमक ठरायचा! आणि यांत कसलाहि अंतर्विरोध नाहीं हें सिद्ध करूं पाहाणारें तात्विक समर्थन सहज पुढें येऊं शकेल.

तथापि जुना स्टालीनप्रणित मार्ग पूर्णपणें स्वीकारला जात आहे असें मात्र यावरून समजण्याचें कारण नाहीं. वैचारिक भूमिकेंत महत्वाचा बदल होण्याचीं चिन्हें दिसत आहेत खरीं. परतु तो कोणत्या दिशेनें होईल हें कांहींच सांगतां येत नाही. काय करायचें याबद्दल क्रुश्चेव्हचा देखील निश्चित निर्णय झाला असेलसें वाटत नाहीं. सोविएट परराष्ट्रीय धोरणांत महत्वाचा बदल होण्याचीं चिन्हें मात्र दिसूं लागलीं आहेत यांत संशय नाहीं.

## नवस्वतंत्र देशांच्या विकासांत विज्ञानाचें स्थान

या वर्षी ऑगस्ट १९ ते २९ पर्यंत इस्रेलमध्यें रेहोवोट शहरांत वाइझमन् इन्स्टिट्युट तर्फे एक आंतरराष्ट्रीय वैज्ञानिक परिषद भरविण्यांत आली होती. परिषदेचा उद्देश नवस्वतंत्र राष्ट्रांच्या विकासकार्यांत विज्ञानाचें स्थान काय आहे या विषयावर विचारविनिमय करणें, हा होता. या परिषदेस ४१ देशांतून १२६ प्रतिनिधि उपस्थित होते. प्रमुख प्रतिनिधी म्हणून नोबेल पारितोषिक विजेते सर् जॉन कॉक्क्रॉफ्ट, प्रा. पी. एम. एस. ब्लॅकेट हे वैज्ञानिक, पूर्वीच्या फ्रेंच कांगोचे अध्यक्ष श्री. आबे फुल्बर्ट युलु, नेपाळचे प्रधानमंत्री श्री. बी. पी. कोइराला, चाद्चे उपप्रधानमंत्री श्री. गेब्रियल लिसेट, यांचा उल्लेख करतां येईल. तसेंच अनेक आफ्रिकन–आशियाई देशांचे मंत्री आणि शिक्षणतज्ञ हजर होते. इस्रेलचे प्रधानमंत्री श्री. बेन गुरिओन् यांनीं या परिषदेपुढे केलेल्या भाषणाचा सारांश खाली देत आहो :

"ही परिषद ही एक ऐतिहासिक घटना आहे, कारण कीं मानवजातीच्या इतिहासांतल्या दोन अतिशय महत्त्वाच्या क्रांतीशी ती संलग्न आहे."

पहिली क्रान्ति म्हणजे एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर आधिपत्य गाजविण्याच्या युगाचा अंत होणें ही होय. जगांतील लहान–मोठीं, श्रीमंत किंवा गरीब, विकसित किंवा अविकसित, अशीं सर्व राष्ट्रें परसत्तेच्या चक्रांतून मुक्त होऊं लागलीं आहेत. दोन शतकांपूर्वी अमेरिका, ऑस्ट्रेलिया, आशिया आणि आफ्रिका या चारहि खंडांतील राष्ट्रें कांहीं थोड्या युरोपिअन साम्राज्यांच्या आधिपत्याखालीं होतीं. विसाव्या शतकाच्या सुरवातीसहि आशियन राष्ट्रांपैकीं बहुतेक आणि जवळजवळ सर्व आफ्रिकन राष्ट्रांवर युरोपियन राष्ट्रें सत्ता गाजवीत होतीं. आज पृथ्वीतलावरचीं सर्व राष्ट्रें स्वातंत्र्य मिळवूं लागलीं आहेत. ही प्रक्रिया अजून पूर्ण झाली नसली तरी ती प्रभावी आणि अचूक आहे. लोकशाही राज्यपद्धति स्वीकारलेल्या राष्ट्राच्या हुकुमतीखालीं आज आशियांतला कोठलाहि देश राहिलेला नाहीं. आफ्रिकेंतले परतंत्र देशहि लवकरच स्वतंत्र होण्याच्या मार्गावर आहेत असें समजायला हरकत नाहीं.

ही विमोचनक्रांति फलदायी ठरायची असेल तर स्वातंत्र्यप्राप्ति हा शेवट नसून सुरवात आहे हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. ...... आजचा सगळ्यांत स्फोटक प्रश्न म्हणजे पूर्व व पश्चिम यांच्यांतलें शीतयुद्ध हा नसून या दोन गटांमधील भौतिक आणि सांस्कृतिक विषमता हें होय. ...... आर्थिक व सांस्कृतिक जीवनमानांतील ही तफावत नष्ट करण्याच्या कामांत प्रगत, धनिक राष्ट्रांनीं सर्वतोपरी साध्य



अनुक्रमणिका








केलें नाहीं तर त्यांनीं आपलें कर्तव्य बजावलें नाहीं असें म्हणावें लागेल. जगांतील सर्व राष्ट्रांतले लोक नुसते स्वतंत्रच नव्हे तर आर्थिक व सांस्कृतिकदृष्टया जवळजवळ एक समान पातळीवर येणार नाहींत तोंपर्यंत जगांत खरी शांतता नांदूं शकणार नाहीं. असें दुभंगलेलें घर टिकूं शकणार नाहीं. आणि त्यांत धोका केवळ गरीब, अप्रगत राष्ट्रांनाच आहे असें नाहीं; श्रीमंत, विकसित राष्ट्रांनाहि तेवढाच धोका आहे. केवळ शिखरपरिषदा भरविण्यानें वा बलाढ्य राष्ट्रांचे परस्पर संबंध सुधारल्यानें विश्वशांती व मानवी ऐक्य प्रस्थापित होईलच असें नाहीं.

दुसऱ्या महायुद्धामुळें होरपळून निघालेल्या युरोपीय राष्ट्रांना आर्थिक साह्य देण्याचें आपलें कर्तव्य जाणणारें व पार पाडणारें अमेरिका हें पहिलें राष्ट्र होय. या मदत–कार्यक्रमामुळे आश्चर्यजनक कार्य झालें आहे. परंतु विश्वसमस्यांचें केंद्र आतां ...... निम्मी अधिक मनुष्यजात वास्तव्य करीत असलेल्या आशिया-आफ्रिका खंडांत सरकलें आहे.

श्रीमंत आणि प्रगत राष्ट्रांनीं दया म्हणून नव्हे तर अखिल मानवकुटुंबाच्या सदस्यांचें कर्तव्य म्हणून साहाय्य दिलें पाहिजे. या साहाय्यामागची भूमिका समता, बिरादरी, आणि एकात्मतेची विश्वव्यापी भावना, ऐतिहासिक अन्यायांचें परिमार्जन करण्याची इच्छा, आणि सर्व जगांत नैतिक, सामाजिक आणि आर्थिक समानतेच्या तत्त्वावर व परस्पराबद्दल वाटणारा विश्वास आणि आदर यावर उभारलेल्या सहकारानें वैज्ञानिक व तंत्रविद्याविषयक शोधांचा मानवजातीच्या हिताकरितां उपयोग करून घेण्याची आकांक्षा - यांवर आधारलेली असली पाहिजे "

बेन गुरिअन पुढें म्हणाले, " दुसरी क्रांति ज्ञानविषयक आणि शास्त्रविषयक असून या क्रान्तीमुळ मानवाच्या आर्थिक समृद्धींत भर पडेल आणि त्याच्या मानसिक-सांस्कृतिक विकासास साहाय्य होईल."

१९४५ सालीं अणुबॉम्बच्या भीषण विनाशकारी स्फोटांतून अणुशक्तीचें दर्शन जगाला झालें. पण या शक्तीचें पर्यवसान विनाशांतच व्हावें असें नाहीं व अपरिहार्य तर नाहींच नाहीं. उलट या शक्तीच्या साहाय्यानें एक नवें सृजनशील सामर्थ्य निर्माण करून मानवी समाजाच्या जीवनांत आमूलाग्र बदल करणें आणि पूर्वी कल्पनाहि करतां आली नसती असें वैभव येथें निर्माण करणें शक्य आहे. आपण या दिशेनें कांहीं पावलें टाकण्यासहि सुरवात केली आहे.

अणु–शक्तीच्या निर्मितीनंतर ज्यावेळीं मानवाला सूर्य–शक्तीचा पुरेपूर उपयोग करून घेतां येईल आणि समुद्राचें निःक्षारीकरण करतां येईल त्यावेळीं मानवाच्या कर्तृत्वाचें एक नवें क्षितिज दिसूं लागेल; वाळवंटांत नंदनवन फुलेल, वैराण जमिनींत पाणी खेळूं लागेल आणि अपरिमित नव्या शक्ति निर्माण होतील.

आजच्या काळांत या ज्या दोन तऱ्हेच्या क्रान्त्या घडून येत आहेत त्यांच्या संगमांतून मानवसमाजाचें स्वरूपच पालटून जाईल; निसर्गांतील सर्व शक्ति आणि शास्त्र व ज्ञान यांनीं साधलेल्या गोष्टी यांचा सहकार्यानें आणि शांततामय जीवनांत उपयोग करणारें सर्व राष्ट्रांचें एक कुटुंब निर्माण होईल. वेगवेगळया राष्ट्रगटांतील, भिन्न वंशाच्या आणि वर्णांच्या लोकांतील दुरावा नाहींसा होईल आणि त्यांच्यांतील तंटेबखेडे नाहींसे होतील. उद्दाम सत्ताधाऱ्यांनीं मेंढराप्रमाणें लोकांवर अधिकार गाजवावा, त्यांचें शोषण करावें, त्यांच्यावर जुलूम करावा, आणि माणुसकीचे हक्कहि त्यांना नाकारावे ही परिस्थिति नष्ट होऊन, स्वातंत्र्य आणि मानवी जीवनाचें पावित्र्य यावर अधिष्ठित असलेला, परस्परांना साहाय्य करणारा आणि उपक्रमशीलतेला उत्तेजन देणारा, असा भेदातीत मानवी समाज निर्माण होईल.

ही परिषद इस्राअलमध्ये भरत आहे हा कांहीं केवळ अपघात नाहीं. आमचा भूगोल लहानसा आहे पण इतिहास मात्र संपन्न आहे. आमचे लोक शतकानुशतकें जगांतील विविध खंडांतील पुढारलेल्या आणि मागासलेल्या देशांत विखुरले होते, आणि आज मानवजातीसमोर असलेल्या समस्या आमच्या या छोट्या राष्ट्रांसमोरहि आहेत. मागासलेल्या आणि गरीब देशांतून आलेले लोक आणि अत्यंत समृद्ध व पुढारलेल्या देशांतून आलेले लोक यांचें ऐक्य आम्हाला साधावयाचे आहे.

या भिन्न परिस्थितींतून आलेल्या नागरिकांच्यांत सुसंवाद निर्माण करणें, त्यांच्यांतील चालीरीतींचे फरक, शैक्षणिक दर्जांतील तफावत, परंपरेची भिन्नता या गोष्टी आड येऊं न देतां स्वातंत्र्य, सहकार्य, सहिष्णुता आणि मानवी ऐक्य यावर आधारलेला एकसंध समाज निर्माण करणें हें आमचें उद्दिष्ट आहे.



अनुक्रमणिका






आम्हांला जाणीव आहे की भौतिक शक्ति व सामर्थ्य या दृष्टीनें आम्हीं एक चिमुकलें राष्ट्र राहूं. पण ज्ञानाच्या, शास्त्रीय प्रगतीच्या क्षेत्रांत संख्येपेक्षां गुणालाच अधिक महत्त्व आहे आणि या क्षेत्रांत आम्ही इतरांच्या मागें रहाणार नाहीं व जगाच्या जीवनांत इतरांप्रमाणेंच महत्वाची भर टाकूं. आज शास्त्राच्या क्षेत्रांत व बौद्धिक जीवनांत जी क्रांति घडून येत आहे, त्या क्रान्तींत आम्हीं आमचा वाटा उचलूं.

या कारणांमुळेंच हा पहिला व अपूर्व मेळावा आमच्या देशांत भरत आहे याचा आम्हाला अभिमान वाटतो. इस्राअलच्या सर्व नागरिकांतर्फे मी आशिया, आफ्रिका, युरप व ऑस्ट्रेलिआ येथील प्रतिनिधींचें स्वागत करतों. तुमची परिषद यशस्वी होऊन, वंश, वर्ण, वर्ग, धर्म या सर्व भेदांना बाजूला सारून व मानवांतील ऐक्य वाढवून जगांतील प्रत्येक स्त्रीपुरुषाचें आर्थिक व सांस्कृतिक जीवन समृद्ध करण्याचें उदात्त ध्येय साध्य करण्याच्या तुमच्या प्रयत्नांना मी सुयश चिंतितों.

## सोव्हिएट रशियांतील राष्ट्रगट

आपल्या देशांतर्गत राष्ट्रगटांचे एकमेकांशीं व केंद्रसत्तेशीं स्नेहभावाचें व उत्स्फूर्त सहकार्याचे संबंध टिकविण्यांत सोव्हिएट रशिया यशस्वी झाला आहे असें मानलें जात होतें. क्रुश्चेव्हच्या विसाव्या कॉंग्रेसपुढील भाषणांत हाहि दावा खोटा ठरविण्यांत आला. त्यानें म्हटलें "सोव्हिएट रशियाच्या आत्तापर्यंतच्या कारकीर्दींत (म्हणजे मुख्यतः स्टॅलिनच्या कारकीर्दींत) लेनिननें पुरस्कारलेल्या राष्ट्रगटविषयक धोरणांना व तत्त्वांना हरताळ फासण्यांत आला आहे." यामुळें सो. रशियाच्या राष्ट्रगटविषयक धोरणाचें मूल्यमापन नव्यानें सुरूं झालें आहे.

'प्रॉब्लेम्स ऑफ कम्यूनिझम' या द्वैमासिकाच्या मे–जून १९६० च्या अंकांत अलेक्स इंकल्स यांनीं "सोव्हिएट नॅशनॅलिटी पॉलिसी इन् परस्पेक्टिव्ह" हा लेख लिहिला आहे. आजच्या रशियांत कोणकोणत्या राष्ट्रगटांचा समावेश झालेला आहे, त्याबाबत झारचें धोरण काय होतें, कम्यूनिस्ट चळवळींच्या काळांत लेनिनचीं मतें काय होतीं, कम्यूनिस्ट क्रांतीनंतर कोणतें धोरण आंखलें गेलें, व प्रत्यक्षांत काय घडलें– याबाबतचें तपशीलवार विवेचन त्यांनीं या लेखांत केलें आहे.

### राष्ट्रगटांचें स्वरूप

सो. रशियांत रशियन लोक बहुसंख्य असले तरी त्यांचें संख्याधिक्य अतिशय अल्प आहे. १८९७ सालीं, म्हणजे झारशाहींत रशियन लोक त्यावेळच्या रशियांत अवघे ४५ टक्के होते. क्रांति व नंतरच्या यादवीयुद्धामुळें कांही प्रदेश फुटून निघाले. त्यामुळें १९२६ सालीं रशियनांचे प्रमाण ५२·९ टक्क्यावर गेलें. १९३९ सालीं शिरगणनेच्या पद्धतींत थोडी सुधारणा (!) करून हें प्रमाण ५८ टक्क्यावर नेण्यांत आलें; तर दुसऱ्या महायुद्धानंतर पोलंडचा कांही भाग व कांही बाल्टिक राष्ट्रांचा सो. रशियांत समावेश करण्यांत आल्यानें १९५९ सालीं हें प्रमाण परत खालीं गेलें. सध्यां सुमारें ५५ टक्के लोक स्वतःला रशियन म्हणवितात; रशियन मातृभाषा असणारांचें प्रमाण आणखी कमी आहे.

इतर अल्पसंख्य राष्ट्रगट ( nationality ) या रशियनांच्या प्रदेशा–( म्हणजे रशियन सोव्हिएट फेडरेटेड सोशॅलिस्ट रिपब्लिकच्या ) भोंवतीं विखुरलेले आहेत. एकूण अल्पसंख्य लोकांच्या पैकीं ८० टक्के लोक पंधरा गणराज्यांत राहतात. लॅट्व्हियन, लिथुआनिअन व एस्टोनियन असे तीन गट वायव्येकडल्या तीन गणराज्यांत आहेत; त्यांची संख्या सुमारें पन्नास लाख आहे. पश्चिम सरहद्दीवर ऐंशी लाख बायलो रशियन, व तीन कोटी सत्तर लाख युक्रेनियन आहेत. या दोन गटांचा व रशियनांचा वंश एकच म्हणजे स्लीव्ह. याच सरहद्दीवर मोल्डव्हिया गणराज्यांत साडेचावीस लाख लोक राहतात; पोल लोकांची संख्या पंधरा लाख आहे, पण त्यांचें स्वतंत्र गणराज्य नाहीं. दक्षिणेकडे व पूर्वेकडे छोटे छोटे राष्ट्रगट आहेत. जॉर्जिया, आर्मेनिया व अझरबैजान यांची लोकसंख्या प्रत्येकीं पंचवीस लाख आहे. शिवाय कांही लाख तातर आहेत. मध्य आशियांतील तुर्कमेन, उझ्बेक, ताद्झिक व किरगिझ हीं चार गणराज्यें व शेजारचें कझाकस्तान मिळून १ कोटी तीस लाख तुर्की मुसलमान आहेत. कांही लाख मुसलमान सरहद्दीपासून आणखी आंतल्या बाजूस आहेत. शेजारच्या प्रदेशांत धर्मानें खिश्चन असलेले पंधरा

अनुक्रमणिका






लाख चुवाश लोक राहतात. बाकीच्या अल्पसंख्या गटांपैकीं मोरद्वियन व ज्यू लोक सगळीकडे पसरले आहेत.

रशियन लोकांपैकी ८५ टक्के लोक मास्को भोंवतालच्या अस्सल रशियन गणराज्यांत राहतात. बाकीचे इतर गणराज्यांत पसरले आहेत, किंवा पसरवले आहेत. त्या त्या ठिकाणीं रशियनांची संख्या १४–१५ टक्क्यापर्यंत गेली आहे. त्यांची वस्ती मुख्यतः शहरांतून आहे, व अशा शहरांत रशियन लोकच बहुसंख्य असतात. कझाकस्तानमध्यें तर इतके रशियन लोक गेले आहेत की खुद्द कझाक आतां तेथे अल्पसंख्य झाले आहेत.

ह्या सगळया अल्पसंख्य गटांना स्वतःची वेगळी संस्कृति आहे, स्वतंत्र भाषा व साहित्य आहे, कांहीं गणराज्यें तर पूर्वी स्वतंत्र राज्यें होतीं. आपल्या पृथगात्म व्यक्तित्वाची जाणीव त्यांना होती व आपलें स्वतंत्र अस्तित्व टिकविण्याची आकांक्षाहि होती. विशिष्ट वंशाचे लोक हे विशिष्ट धर्मपंथाचे अनुयायी आहेत. वंश व धर्मपंथ यांचे छेद गेलेले नाहींत. आपण रशियन राष्ट्रीय संस्कृतींत विलीन होऊन जावें, आपलें नामोनिशाणहि राहूं नये असें त्यांना वाटणें शक्यच नव्हतें. मॉस्कोच्या केंद्रसत्तेशीं कांहीं थोडे ऐतिहासिक लागेबांधे निर्माण झाले असले तर 'राष्ट्रगट म्हणून असलेल्या स्वतंत्र अस्तित्वाचा त्यांना विसर पडला नव्हता. असें असताना त्यांचें नव्या रशियन संस्कृतीत संपूर्ण विलिनीकरण कसें घडून आलें ? स्वयंप्रेरणेनें वा स्वेच्छेनें हें घडलेलें दिसत नाहीं. रशियाच्या याबाबतच्या धोरणांतच त्याचें मूळ सांपडेल.

मध्य युगांत खानांनीं रशियन लोकांना जिंकून घेतलें होतें. ही गुलामगिरी अनेक शतकें सहन करावी लागली. १५५२ पासून मात्र काळ पालटला. रशियाच्या साम्राज्यविस्ताराला सुरवात झाली. तें काम चारशें वर्षें चाललें. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत दररोज पन्नास चौरस मैल या वेगानें रशियाचा साम्राज्यविस्तार होत होता. तेव्हा रशियांत कांहीं अल्पसंख्य गट होते (जसे भारतांत आहेत) असें म्हणणें चूक आहे. रशियाचें हें एक प्रचंड साम्राज्य होतें. इतर युरोपियन राष्ट्रांच्या प्रमाणेंच रशियाहि साम्राज्यवादी होता. फरक इतकाच की इतर राष्ट्रांचीं मांडलिक राष्ट्रें दूर दूर व एकमेकापासून अलग होतीं— बहुतेकांचीं साम्राज्यें आशिया व आफ्रिका खंडांत होतीं. रशियाचीं मांडलिक राष्ट्रें मात्र रशियाच्या मुख्य प्रदेशाशीं संलग्न अशीं होतीं. त्यामुळें इतरांच्याप्रमाणें साम्राज्य दिसण्याऐवजीं रशिया हें एक प्रचंड राष्ट्र आहे असें दिसूं लागलें. आणि म्हणून त्याच्या अंतर्गत असलेल्या राष्ट्रगटांना इतर आशियाई– आफ्रिकी देशांप्रमाणेंच संपूर्ण स्वातंत्र्य मिळालें पाहिजे, हा खरा प्रश्न आहे, असें न वाटतां रशियाचें साम्राज्यस्वरूप राष्ट्र जसेंच्या तसें रहायला हरकत नाहीं, फक्त त्यांतील अल्पसंख्य राष्ट्रगटांना जरा मानाचें स्थान असावें, एवढीच अपेक्षा इतिहासकारांनीं ठेवली.

रशियाच्या साम्राज्यसत्तेविरुद्ध या सर्व मांडलिक राष्ट्रगटांत असंतोष धुमसत होता. त्यांना आपलें स्वातंत्र्य मिळवायची आकांक्षा होती. ह्या असंतोषाचा फायदा क्रांतिकारकांना घेतां आला असता. पण मार्क्सचा सिद्धान्त आडवा आला! मार्क्सच्या भविष्यवाणीनुसार इतिहासाची प्रगति प्रचंड उद्योगप्रधान, केंद्रानुवर्ती व समधात राजकीय गट स्थापन करण्याच्या दिशेनें होणार होती. यांतूनच श्रमजीवींचा नवा समाज निर्माण होणार होता. राष्ट्रीयत्व, राष्ट्रीय स्वातंत्र्य या कल्पना बुरसटलेल्या भांडवलशाही आधारानें तग धरणाऱ्या होत्या. क्रांतिकारकांना त्यांचा आसरा घेणें हा क्रांतिद्रोह ठरला असता!

म्हणून लेनिननेंहि या प्रश्नाकडे बराच काळपर्यंत दुर्लक्ष केलें. १९०५-६ च्या क्रांतीनंतर राष्ट्रगटांना थोडें उदारपणें वागवायला सुरवात झाली. यांतून मोठया प्रमाणावर विभक्तीकरण होणार कीं काय अशी भीति वाटूं लागली. १९१३ च्या सुमारास लेनिनला याची दखल घ्यावी लागली. बॉवर–रेनरचा राष्ट्रगटांना वाढते अधिकार देणारा कार्यक्रम लोकप्रिय होत होता; आणि लेनिनला हेंहि समजून चुकलें की त्याच्या क्रांतिकार्याचा राष्ट्रनिष्ठेशीं कांहींतरी संबंध जोडला पाहिजे.

मार्क्सच्या आंतरराष्ट्रवादी भूमिकेशीं सुसंगत ठरेल पण त्याच बरोबर राष्ट्रगटहि खूष होतील अशी भूमिका त्यानें घेतली. तात्त्विक दृष्ट्या या अल्पसंख्य गटांना स्वयंनिर्णयाचा हक्क असला पाहिजे असें त्यानें निःसंदिग्ध शब्दांत सांगितलें. पण पुढचें त्याचें म्हणणें असें की इतिहासाच्या मार्क्सवादी नेमिक्रमामुळें आपण










मोठया गटांतून फुटून निघावें असें राष्ट्रगटांना वाटणारच नाहीं. त्या राष्ट्रगटांनाहि आंतरराष्ट्रीय कामगारशाहीची ओढ लागेल. आपापलें वेगळें सांस्कृतिक वैशिष्टय कस्पटासमान लेखून ते मोठया गटांत विलीन होऊन जातील. तरी पण जर त्या **गटांना फुटून निघावेसें वाटलें तर त्यांचा तो अधिकार कधींहि नाकारला जाणार नाहीं.**

स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा पुरस्कार करणें त्यावेळच्या राजकारणाच्या दृष्टीनें आवश्यक होतें. तरी लेनिननें असेंहि म्हटलें कीं एकदा कामगारक्रांतीला सुरवात झाली कीं हा हक्क बजावावा असें कुणाला वाटणारच नाहीं; वाटलें तर तें प्रतिगामी भांडवलशाही प्रतिक्रांतीचें लक्षण समजावें ! मार्क्स निष्ठेसाठीं अशी कसरत करण्याखेरीज त्याचा इलाजच नव्हता.

प्रत्यक्षांत लेनिननें या शेवटच्या मताचाच अवलंब केला. १९१७च्या क्रांतीनंतर वेगवेगळ्या प्रांतांत उठाव झाले; तेव्हां तेथें तेथें कम्युनिष्ट सैन्य पाठविण्यांत येऊन त्या उठावांचा बीमोड करण्यांत आला ! मध्य आशियांत फरूझ व कुबिशेव्ह, उत्तर कॉकेशसमध्यें किरॉव्ह आणि ऑर्दु झॉनिकिट्झ, बेलोरशियांत कागानोव्हिच, आणि अझरबैझानमध्यें मिकोयान या सेनानींनीं प्रतिक्रांतिकारकांना–म्हणजेच पर्यायानें स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला मूठमाती दिली !

क्रांति स्थिर करण्याच्या कालखंडांतहि हेंच धोरण अवलंबिलें गेलें. पण त्याचा कालानुक्रमें विचार करण्याऐवजीं चार प्रश्नांचीं उत्तरें शोधून याबाबतचें मत बनवणें जास्त सोयिस्कर होईल.

स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य केला तर तो बजावला जाण्याची तरतूदहि असली पाहिजे. सो. रशियाच्या घटनेंत हा हक्क मान्य करण्यांत आला आहे. प्रत्यक्षांत तो बजावण्यासारखी परिस्थिति निर्माण करण्यांत आली का ?

अर्थात् कोणालाहि हें समजतें कीं आपल्या विस्तृत प्रदेशाची खांडोळी करायला कोणी स्वतः होऊन सज्ज होणार नाहीं. मग तो चर्चिल असो की स्टॅलीन असो. पण जर एखाद्या मांडलिक प्रदेशांत स्वयंनिर्णयाच्या हक्कासाठीं लोकांनीं चळवळ केली तर ती दडपून टाकूं नये, त्यांच्या मागणीचा सहानुभूतिपूर्वक विचार करावा अशी जबाबदारी तो हक्क घटनेंत मान्य करणारांवर येते. दुसऱ्या महायुद्धानंतर इंग्लंड, फ्रान्स व इतर कांहीं युरोपिअन साम्राज्यवादी राष्ट्रांनीं कुरकुरत का होईना पण ही जबाबदारी पार पाडली.

सो. रशियानें काय केलें ? अल्पसंख्य राष्ट्रगटांनीं स्वयंनिर्णयासाठी चळवळ करावी अशी प्रेरणा मास्कोनें द्यायला हवी होती असें कोणी म्हणणार नाहीं. पण तशा चळवळी झाल्या तर त्याबाबत जबाबदारीनें वागायला हवें होतें. पण तसें झालें नाहीं. स्वयंनिर्णयाची चळवळ करणें हा क्रांतिद्रोह मानण्यांत आला. गेल्या तीस चाळीस वर्षांत जेव्हां जेव्हां कम्युनिस्ट पक्षाचें शुद्धिकरण करण्यांत आलें तेव्हां तेव्हां अपराधी कार्यकर्त्यांवर राष्ट्रगटांना स्वतंत्र होण्याची चिथावणी दिल्याचा आरोप ठेवण्यांत आला. दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत व्होल्गा जर्मन, क्रिमियन तातर, काल्मयक व चेचेनइंगुश या चार गणराज्यांना तिलांजलि देण्यात आली ! टिटोनें तर असा आरोप केला आहे की सो. रशियानें कांही वंशांचें शिरकाण केलें ! कांही वंशांच्या लोकांना त्यांच्या परंपरागत प्रदेशांतून उठवून इतस्ततः फेकण्यांत आलें !

दुसरा प्रश्न असा की अल्पसंख्य गटांना आपल्या वेगळ्या सांस्कृतिक परंपरेची जोपासना करण्याची संधि व साह्य मिळतें का ? या बाबतींतलें सो. रशियाचें धोरण वैशिष्टयपूर्ण आहे. त्यांची घोषणाच अशी आहे की प्रत्येक गटाच्या आणि पर्यायानें सगळया देशाच्या संस्कृतीनें " राष्ट्रीय स्वरूप; पण समाजवादी आशय " वाढवला पाहिजे. सगळया गटांचीं मूल्यें समाजवादीच असलीं पाहिजेत–नसलीं तर तीं लादलीं जातील. याचा व्यवहारांत काय अर्थ होतो तें स्पष्ट आहे.

या धोरणांत समाजवादी समानतेवर विशेषभर दिलेला आहे. समाजरचनेचा आदर्श मॉस्को पुरस्कृत असला पाहिजे - असा आग्रह आहे. हा आदर्श किती सर्वंकष व सांचेबंध आहे हें सगळयांना माहितच आहे. त्यामुळें राष्ट्रवादी स्वरूप ठेवून समाजवादी आशय आणतांना अल्पसंख्य राष्ट्रगटांची संस्कृति कितपत बचावली असेल याची सहज कल्पना येते.

या राष्ट्रगटांच्या संस्कृतींचीं कोणकोणतीं वैशिष्टये टिकून राहिलीं आहेत हें पाहिलें पाहिजे. मुख्य म्हणजे भाषा. बहुतेक सगळया भाषा टिकून आहेत– हें मान्य

केलें पाहिजे. अपवाद फक्त 'यिड्डीश' च्या भाषेचा ! भाषेबरोबर काव्य, महाकाव्य, नाट्य इत्यादि साहित्य-प्रकार निर्मिण्यास स्वातंत्र्य आहे. लोककला व त्यांचे हस्तव्यवसाय टिकून आहेत. लोकांच्या परंपरागत पोषाखांत बदल करण्याचे प्रयत्नहि फारसे झालेले नाहींत. संस्कृतीच्या अशा वेगवेगळया पैलूंच्या बाबतींत स्वातंत्र्य देण्याचें सोव्हिएट रशियाचें धोरण एका मर्यादेपर्यंतच खरें आहे. याबाबतींतील सहिष्णुता कम्युनिष्ट क्रांति-कार्यांत आड येणार नाही— याची कसोशीनें काळजी घेतलेली असते.

अर्थात गरज पडली म्हणजे या बाबतच्या स्वातं-त्र्याचा संकोच करण्यांत आलेला आहे. मुस्लिमांची आरेबिक लिपि नष्ट करण्यांत आली आहे. अनेक वेळां जुनें व नवें लोकसाहित्य, नाटकें, ऑपेरा इत्यादि जप्त करण्यांत येऊन तें बेकायदेशीर ठरविण्यांत आलें. प्रादेशिक इतिहास एका विशिष्ट पद्धतीनेंच लिहिला पाहिजे, 'झारचें वर्चस्व ही ऐतिहासिकदृष्टया प्रगति-शील घटना आहे.' असा आग्रह धरला जातो. ज्यूंच्या बाबतींत तर अगदीं कमाल करण्यात आली. त्यांच्या संस्कृतीचीं सर्व साधनें नष्ट करण्यात आलीं. आणि सगळयाच अल्पसंख्य धर्मांच्या बाबतींत अतिशय कांटेकोर भूमिका घेण्यात येऊन तें दडप-ण्यात आलें.

संस्कृतीच्या अभिव्यक्तीचीं हीं साधनें सोडलीं तर त्यांच्याशीं संबंधित असलेल्या सामाजिक रचनेच्या बाब-तींत नाममात्रहि सहिष्णुता दाखवण्यांत आली नाहीं. खास सोव्हिएट रचना सगळीकडे लादण्यांत आली. लोकांचा त्याला विरोध झाला पण तो चिरडून टाकण्यांत आला. या बाबत कझाकस्थानचें उदाहरण अतिशय विदारक आहे. तिथल्या लोकांचा व्यवसाय गुरें पाळणें व त्यासाठीं बदलत्या ऋतुमानानुसार निरनिराळया प्रदेशांत भटकणें हा होता. पण त्यांच्यावर सामू-हिक पद्धतीनें वस्ती करण्याचें बंधन घालण्यांत आलें. कझाक लोकांनीं त्याला विरोध केला. सरकार आपल्या विरोधाला जुमानत नाहीं असें पाहून त्यांनीं गवत व पिकें जाळलीं, गुरें मारलीं, पण कशाचाहि उपयोग झाला नाहीं. १९२८ च्या तुलनेनें १९३४ सालीं २५ ते ५० टक्के गुरें, १३ टक्के शेळया व १२ टक्के घोडे शिल्लक राहिले होते. स्टॅलिनचें यावरचें भाष्य असें — " आपणाला हा कार्यक्रम पार पाडलाच पाहिजे मग त्यासाठीं किंमत द्यावी लागली तरी पर्वा नाहीं. आवश्यक तो त्याग केलाच पाहिजे. " त्याग कुणाचा हा प्रश्न वेगळा !

याबाबतीत मात्र सोव्हिएट रशियाचा कारभार वाखाणण्यासारखा आहे. शिक्षण, रोजगार, मजूरी, सामाजिक अभिसरण, हालचालींचें स्वातंत्र्य, निवास-स्थानाची निवड इत्यादि बाबतींत रशियन लोक व अल्पसंख्य जमाती यांना सारखीच संधि दिली जाते. एकूण रशियाचें साक्षरतेचें प्रमाण १९५९ सालीं ९८.५ टक्के होतें. अझरबैजान, कझाकस्थान इत्यादि गणराज्यांत १९२६ सालीं जेमतेम ४१६ टक्के साक्षरता होती तीहि आतां रशियाच्या सरासरी पातळीपर्यंत आलेली आहे. ज्यूचा अपवाद केला तर बाकी सर्व अल्पसंख्यांकांना ही समानता मिळालेली आहे असे रशियांतून आलेले निर्वासित लोक ग्वाही देतात.

दुर्दैवानें ही समानता सत्तेच्या क्षेत्रांत मात्र दिसत नाहीं. खुद्द कम्युनिस्ट पार्टींत रशियन लोकांचें फार मोठें मताधिक्य आहे. अल्पसंख्य जमातींचें प्रतिनिधित्व अत्यल्प आहे. १९५२ पर्यंत पॉलिट ब्यूरोच्या २८ सभासदांपैकीं १६ खास रशियन व ८ रशियन बनलेले ज्यू व जॉर्जियन होते. ८ कोटी लोकसंख्या असलेल्या १३ गणराज्यांना त्या मंडळावर कधीहि प्रतिनिधित्व मिळालें नाहीं. १९५२ नंतर प्रेसिडियमवर ३३ सभासदांपैकीं फक्त ८ बिगर रशियन होते. यांतच स्टॅलिन आला. तसेंच पार्टीच्या दुय्यम अधिकाराच्या जागावरहि रशियन लोकच नेमण्यांत येत असत. निर-निराळया प्रादेशिक पक्ष समित्यांच्या सेक्रेटरी पदावर रशियन लोकच नेमले जात असत. युक्रेन या प्रदेशाचा कम्युनिस्ट पार्टीचा चिटणीस हा बिगर युक्रेनियन असे, याला अपवाद फक्त किरीचेंको कीं, जो सध्यां अज्ञात-वासांत आहे.

शेवटचा प्रश्न असा कीं, आर्थिक विकासाच्या बाबतींत अल्पसंख्यकांना दुय्याभावानें वागवण्यांत आलें कां ? याबाबतींत असें म्हणतां येईल कीं, सोव्हि-एट रशियाचें धोरण पक्षपाती नव्हतें. रशियाचा आर्थिक विकास हा जबरदस्तीच्या, बचतीच्या आधारावरच झालेला आहे. पण याबाबत पक्षपात झाला नाहीं. अल्पसंख्य लोकांना रशियन लोकांपेक्षां



अनुक्रमणिका






जास्त त्याग करावा लागला नाहीं. उलट असेंहि म्हणतां येईल कीं, सुरवातीच्या काळांत रशियन लोकांनीं जास्त त्याग केला व मागासलेल्या प्रांतांच्या विकासाला साहाय्य केलें.

एका अर्थशास्त्रज्ञानें असा अंदाज केला आहे कीं, १९३०-४० च्या दरम्यान सोव्हिएट रशियाचें सरासरी राहाणीमान जेव्हां बसरलें होतें; तेव्हां मध्य-आशियांतील चार गणराज्यांचें जीवनमान थोडें वाढलेंच होतें. मागासलेल्या प्रदेशांचा औद्योगिक विकास साधण्यासाठीं त्या भागांत नवनवे कारखाने काढण्यांत आले. मध्य आशियांत सुरवातीला जेव्हां कापसाचें पीक लावण्यांत आलें तेव्हां त्या भागाचें गव्हाचें पीक बुडाल्यानें नुकसान झालें. पण पुढें त्या भागांत कापडाच्या गिरण्या निघाल्यानें परिणामी त्या भागाचा फायदा झाला असेंच म्हटलें पाहिजे. अर्थात् या सगळ्या विकासाच्या मागें सगळ्या देशाची आर्थिक कार्यक्षमता वाढविणें व संरक्षणाच्या दृष्टीनें पुरेशी व्यवस्था करणें हा उद्देश होता. तरी त्यांत अल्पसंख्यकांवर अन्याय झाला नाहीं एवढें मान्य करायला हरकत नाहीं.

सोव्हिएट रशियाच्या अल्पसंख्य राष्ट्रगटांच्या बाबतच्या धोरणाचीं हीं वैशिष्टयें १९३० सालापासून आजपर्यंत चालत आलेलीं आहेत. क्रुश्चेवनें अलिकडे युक्रेनियनलाच युक्रेन मधल्या सर्वश्रेष्ठ पदावर नेमणें किंवा अल्पसंख्य जमातींना जास्त प्रतिनिधित्व देणें किंवा त्या प्रदेशांना वारंवार भेटी देणें यासारखे उपक्रम सुरू केले असले तरी स्टॅलिनच्या धोरणांत त्यानें कांहीं विशेष फरक केला आहे असें मात्र नाहीं. मूळ धोरण चालूच आहे.

## कांहीं बोलके आकडे

पाश्चात्य वसाहतवादाचा विरोध हें भारतीय परराष्ट्रनीतीचें व सामान्यतः सर्वच राजकीय विचारपद्धतीचें एक महत्त्वाचें सूत्र समजलें जातें. पाश्चात्य राष्ट्रांविषयींचा आमचा दृष्टिकोणहि कित्येकदा या कल्पनेनेंच निश्चित होतो. तथापि ही भूमिका कितीहि रास्त वाटली तरी तिला आधारभूत असलेली परिस्थिति झपाट्यानें बदलत आहे हें विसरतां कामा नये. या दृष्टीनें पुढील माहिती उद्बोधक वाटेल म्हणून देण्यांत येत आहे.

१९३९ ते १९६० च्या काळांत पाश्चात्य राष्ट्रांच्या वर्चस्वापासून पुढील राष्ट्रें पूर्णतया मुक्त होऊन स्वतंत्र झालीं. त्यांच्यावर राज्य करणारें पाश्चात्य राष्ट्र, त्यांचें क्षेत्रफळ व लोकसंख्या हीं येथें दिलीं आहेत :

| देश | (पूर्वींची सत्ता) | क्षेत्रफळ | लोकसंख्या (आकडे हजाराचे) |
|---|---|---|---|
| ब्रह्मदेश | ( ब्रिटिश ) | २६१७८९ | २००५४ |
| कांबोदिया | ( फ्रेंच ) | ८८७८० | ५००० |
| कामेरून्स | ( फ्रेंच ) | १६६४८९ | ३१८७ |
| मध्य आफ्रिकन– | | | |
| प्रजासत्ताक | ( फ्रेंच ) | २३८००० | ११२१ |
| सिलोन | ( ब्रिटिश ) | २५३३२ | ९१६५ |
| छाड | ( फ्रेंच ) | ४९६००० | २५२१ |
| काँगो– | | | |
| प्रजासत्ताक | ( फ्रेंच ) | १३२००० | ७४५ |
| सायप्रस | ( ब्रिटिश ) | ३५७२ | ५३६ |
| दहॉमे | ( फ्रेंच ) | ४५९०० | १६१४ |
| एरिट्रिया | ( इटालियन ) | ४८३५० | १०८० |
| गॅबाँ | ( फ्रेंच ) | १०३००० | ३८३ |
| घाना | ( ब्रिटिश ) | ९१८४३ | ४७६३ |
| गिनी | ( फ्रेंच ) | १०५२०० | २५०५ |
| हिंदुस्तान | ( ब्रिटिश ) | १२६६२१६ | ३९२४४० |
| इंडोनेशिया | ( डच ) | ७३५८६५ | ८५५०० |
| इस्रायल | ( ब्रिटिश ) | ८०४८ | १९८० |
| आयव्हरी कोस्ट | ( फ्रेंच ) | १२३२०० | २४८१ |
| जॉर्डन | ( ब्रिटिश ) | ३७५०० | १५०० |
| लाओस | ( फ्रेंच ) | ९१४५० | ३००० |
| लेबेनॉन | ( फ्रेंच ) | ४००० | १५२५ |
| लिबिया | ( इटालियन ) | ६७९३५८ | ११०० |
| मालागासी– | | | |
| प्रजासत्ताक | ( फ्रेंच ) | २२७८०० | ५०७१ |
| मलाया | ( ब्रिटिश ) | ५०६९० | ६२७७ |
| माली ( सेनेगाल व सुदान ) | | | |
| | ( फ्रेंच ) | ५३९५८४ | ५९६० |
| मोरोक्को | ( फ्रेंच ) | १७२१०४ | ९८२३ |
| नेपाळ | ( ब्रिटिश ) | ५४००० | ८४३२ |
| नायजर | ( फ्रेंच ) | ४९४५०० | २३३४ |
| पाकिस्तान | ( ब्रिटिश ) | ३६४७३७ | ८४७७७ |








| | | | |
|---|---|---|---|
| फिलिपाइन्स | (अमेरिका) | ११५६०० | २३००० |
| काँगो | (बेल्जियन्) | ९०४७५७ | १३५५९ |
| सोमालिया | (इटालियन) | १९४००० | १२५५ |
| द० कोरिया | (जपान) | ३८४५२ | २२२५० |
| द. विएटनाम | (फ्रेंच) | ६६३५० | १२००० |
| सुदान | (ब्रिटिश) | ९७१४५० | १०००० |
| सिरिया | (फ्रेंच) | ७२२३४ | ३९७० |
| टोगोलँड | (फ्रेंच) | २१८९३ | १०८८ |
| ट्युनिशिया | (फ्रेंच) | ६०१६५ | ३८०० |
| अप्पर वोल्टा | (फ्रेंच) | १०५९०० | ३३२४ |

एकूण ९२०६१०८ चौ. मै. ७६९१२००००

(जवळ जवळ ७७ कोटी)

या व्यतिरिक्त पुढील राष्ट्रांच्या स्वातंत्र्यप्राप्तीची निश्चित तारीख ठरली आहे.

| | | चौ. म. | हजार |
|---|---|---|---|
| ब्रिटिश कामेरून्स | (ब्रिटिश) | ३४०८१ | १५६२ |
| नायजेरिया | (ब्रिटिश) | ३७३२५० | ३१८०० |

यांतील नायजेरिया स्वतंत्र झाल्याचें आतां जाहीर झालें आहे. खेरीज १९३९-६० च्या काळांत पुढील वसाहतींना स्वातंत्र्य मिळालें आहे:—

| | | चौ. मै. | हजार |
|---|---|---|---|
| मॉरिटानिया | (फ्रेंच) | ४१५९०० | ६१५ |
| मध्य आफ्रिका संयुक्तराज्य | (ब्रिटिश) | | |
| (अ) उ. ऱ्होडेशिया | | २९०३२३ | २१८० |
| (आ) न्यासालँड | | ४७४०४ | ३२६६ |
| (इ) द. ऱ्होडेशिया | | १५०३३३ | २४८० |
| सिंगापुर | (ब्रिटिश) | २१७ | १४६७ |
| ब्रि. वेस्ट इंडिज् फेडरेशन | (ब्रिटिश) | ८००५ | ३१०८ |
| साउथ वेस्ट आफ्रिका | (ब्रिटिश) | ३१७८८७ | ४४७ |

एकूण १२३०६९

—१,३५,६३,०००

तात्पर्य, १९३९ ते १९६० दरम्यानच्या काळांत पाश्चात्य राष्ट्रांच्या राजकीय वर्चस्वाखालीं असलेली सुमारें ८१ कोटी जनता स्वतंत्र झाली. व आणखी सुमारें तीन ते चार कोटी जनता लवकरच स्वतंत्र होईल अशीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. यामुळें वसाहतवादाच्या विरोधाचा वस्तुनिष्ठ पाया बव्हंशीं नाहींसा झाला असून या विरोधाचें स्वरूप आतां प्रचारात्मक बनत आहे असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. हा प्रचार कम्युनिस्ट राष्ट्रांच्या धोरणाला पोषक आहे हें उघड आहे. यामुळेंच कित्येकदां कम्युनिस्टांच्या नव्या वसाहतवादाचें काय असा प्रश्न विचारला जातो. या दृष्टीनें दुसऱ्या बाजूचे काहीं आकडेहि ध्यानांत घेणें जरूर आहे.

आज सोविएट युनियन म्हणून ओळखल्या जाणाऱ्या राज्यांत रशियनेतर निरनिराळया जमातींची संख्या ९,४२,३४,९०० इतकी आहे. याहृष्टींनें १९२० ते १९५९च्या दरम्यान झालेली सोविएट भूप्रदेशाची व लोकसंख्येची वाढ दर्शविणारे पुढील आकडे उद्बोधक वाटतील.

| | क्षेत्रफळ चौ. मै. | लोकसंख्या (हजार) |
|---|---|---|
| युक्रेन | २३२६६४ | ४१८६९ |
| जॉर्जिया, आर्मेनिया, आझरबैजान् | ७४०९३ | ९५०५ |
| लिथुआनिया | ३१२०० | २७११ |
| लाट्विया | २५३०५ | २०९३ |
| एस्तोनिया | १८३५३ | ११९७ |
| पूर्व पोलंड | ६९८६० | १२७७५ |
| पूर्व रशिया | ७००० | ९०० |
| बेसरेबिया व उ० बुकोविना | १३१०० | २६६० |
| सब्-कार्पेथियन् रुथेनिया | ५००० | ८०० |
| कारेलिया | ६८८१९ | ६०० |
| साखालिन् | १३०३० | ३०० |
| तन्नु तुवा | ६४००० | ६५ |
| कुरिल बेटें | ५७०० | १५ |
| एकूण | ६२८१२४ | ७५४९० |
| उर्वरित सोविएट युनियन | ७२४९४७४ | १३३३३७ |
| एकूण सो० युनियन | ७८७७५९८ | २०८८२७ |

(जवळजवळ २१ कोटी)

हा एक भाग झाला. दुसऱ्या दृष्टीनें विचार केल्यास सोविएट व चिनी साम्यवादाच्या अंकित असलेल्या पण वरवर स्वतंत्र वाटणाऱ्या राष्ट्रांचा विचार करणेंहि



अनुक्रमणिका






आवश्यक आहे. या प्रकारचे आकडे पुढील प्रमाणें देतां येतील :

| | क्षेत्रफळ (चौ. मै.) | लोकसंख्या (हजार) |
|---|---|---|
| चीन मांचुरिया, दारिएन | ४२४९८७५ | ६४४५०० |
| उ. व्हिएटनाम | ६३००० | १३००० |
| उ. कोरिया | ४८५०६ | ९१५० |
| तिबेट | ४७५००० | १००० |
| अलटर मंगोलिया | १७५०००० | ७४० |
| पोलंड | १२०३५५ | २८५३५ |
| पूर्व जर्मनी | ४२११२ | १८००० |
| रुमानिया | ९१५८४ | १७८२९ |
| झेकोस्लोवाकिया | ४९३८१ | १३३५३ |
| हंगेरी | ३५९०२ | ९८१२ |
| बल्गेरिया | ४२७९६ | ७६६७ |
| अल्बेनिया | १०६२९ | १४२१ |
| एकूण | ६९७९१४० | ७६,५०,०७,००० (७६ ½ कोटी) |

तात्पर्य, गेल्या तीस वर्षांत सुमारें ८० कोटी जनता पाश्चात्य साम्राज्यवादापासून मुक्त झाली; व सुमारें ७७ कोटी जनता या ना त्या स्वरूपांत साम्यवादाच्या वर्चस्वाखालीं आली व याशिवाय सुमारें २ कोटी जनता सोविएट राजवटीच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखालीं आणली गेली. अशी ही वस्तुस्थिती आहे. भूप्रदेशाच्या दृष्टीनें पाहिल्यास सुमारें ९८ लाख चौ. मै. इतका भूप्रदेश स्वतंत्र झाला; व सुमारें ७० लाख चौ. मै. भूप्रदेश साम्यवादाच्या वर्चस्वाखालीं आला असें म्हणतां येईल.

---










**राष्ट्रीय प्राचार्य श्री. पांडुरंग वामन काणे**

# ब्रह्मीभूत स्वामी केवलानन्दसरस्वती

[ श्री ब्रह्मीभूत स्वामी केवलानंदसरस्वती यांच्या स्मरणार्थ वाई येथें प्राज्ञपाठशाळामंडळानें एक प्रणव मंदिर बांधलें आहे. या मंदिराचा उद्घाटन समारंभ भारताचे राष्ट्रपति श्री राजेन्द्रप्रसाद यांच्या हस्तें ता. १३ डिसेंबर १९६० ला व्हावयाचा आहे. त्या निमित्तानें या अंकांत स्वामीजींच्या संबंधाचे लेख प्रसिद्ध करीत आहोत.—का. संपादक. ]

संन्यासाश्रम हा ऋग्वेदकाळीं प्रचलित होता कीं नाहीं याबद्दल वाद आहे. ऋग्वेदांतहि 'मुनयो वातरशनाः पिशङ्गा वसते मला' (१०.१३६.२) या शब्दांत वातरशनाचे पुत्र मुनि होऊन कपिलवर्णाचीं मलिन वस्त्रें वापरतात असा उल्लेख आहे. त्याच्याच पुढच्या ऋचेंत ते ऋषि म्हणतात, 'मुनिभाव धारण केल्यामुळें आम्ही उन्मत्तवत् दिसतों आणि आम्ही प्राणाची उपासना करितों.' परंतु याच्या उलट इंद्रानें यतींना लांडग्यांच्या स्वाधीन केलें असें वर्णन तैत्तिरीय संहितेंत आहे ('इंद्रो यतीन् सालावृकेभ्यः प्रायच्छत्' तै. सं. ६.२.७.५) व यती खाल्ले जात असतां त्यांचीं शिरें बाजूला पडलीं व त्यापासून खजूर निर्माण झाला (तै. सं. २.४.९.२). तें कांहीं असो, पुढील काळांतहि संन्यासाश्रम श्रुतिविरुद्ध आहे असा पक्ष होता. त्यांचें म्हणणें 'यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात्', 'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः' (वाज. सं. ४०.२) इत्यादि वाक्यांनीं संन्यासाश्रमाचा बाध होतो. तथापि उपनिषत्काळीं संन्यासाश्रम रूढ झाला होता हें बृहदारण्यकोपनिषदावरून स्पष्ट होतें. याज्ञवल्क्य महर्षि मैत्रेयी नांवाच्या आपल्या ज्येष्ठ पत्नीला म्हणतात, 'मी हें स्थान (गृहस्थाश्रम) सोडून प्रव्रज्येचा स्वीकार करणार आहें' (बृह. उप. ४.५.२ प्रव्रजिष्यन् वा अरेऽहमस्मात्स्थानादस्मि). हें दुसरें मत असें कीं, ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम क्रमानें झाल्यावर परिव्राजक व्हावें. तिसरा पक्ष जाबालोपनिषदांत आहे : जनक याज्ञवल्क्याला म्हणतो कीं, संन्यासाश्रमाचें विवरण कर. त्यावर याज्ञवल्क्यांनीं उत्तर दिलें कीं ब्रह्मचर्यकाल संपवून गृही व्हावें, नंतर वनस्थ व्हावें, नंतर प्रव्रज्या स्वीकारावी; किंवा दुसरा मार्ग असा कीं, ब्रह्मचर्यानंतर किंवा गृहस्थाश्रमानंतर किंवा वानप्रस्थाश्रमानंतर प्रव्रज्या स्वीकारावी म्हणजे ज्यादिवशीं या संसाराबद्दल विरक्ति उत्पन्न होईल त्या दिवशींच प्रव्रज्या स्वीकारावी (जाबालोप. ४ 'यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वा .... यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत्'). या आश्रमांविषयींच्या पक्षांचा ऊहापोह वेदांतसूत्रांत (३.४.१८–२०) केलेला आहे. त्यावरील भाष्यांत शङ्कराचार्यांनीं म्हटलें आहे कीं, जाबालोपनिषदांतील वचनाची अपेक्षा न करितां बादरायणाचार्यांनीं ऊहापोह केला आहे (अनपेक्ष्यैव जाबालश्रुतिमाश्रमान्तरविधायिनीमयमाचार्येण विचारः प्रवर्तितः). यावरून कांहीं विद्वानांनीं अनुमान काढिलें आहे कीं, वेदान्तसूत्रकाराच्या वेळीं जाबालोपनिषद् नसावें किंवा मान्य तरी नसावें.

ब्रह्मीभूत स्वामीनीं या तिसऱ्या पक्षाचा अङ्गीकार करून ब्रह्मचर्याश्रमानन्तरच संन्यासाश्रमाचा स्वीकार केला. जाबालोपनिषदांत त्या आश्रमाचीं कर्तव्यें थोडक्यांत सांगितलीं आहेत : परिव्राजक हा काषायवस्त्रें (शुभ्र नव्हेत) परिधान करितो, मुण्डन करितो, अपरिग्रह (म्हणजे स्वतःच्या मालकीचें असें कांहीं करीत नाहीं), शुचि, कोणाचा द्रोह करीत नाही (सर्वभूहितरत असतो), भिक्षा मागतो, असा वागून तो ब्रह्मभावाप्रत पोंचतो. कठोपनिषदांत वर्णन केल्याप्रमाणें क्षुरधारेप्रमाणें तीक्ष्ण व अत्यन्त कठीण असा हा मार्ग आहे ('क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति' कठोप. ३.१४). गौतमधर्मसूत्र (३।१०-२४), आप. धर्मसूत्र (२.९.२१.७



अनुक्रमणिका







–१७), मनुस्मृति (–६.३३–८६), याज्ञ. स्मृति (३.५६-६६) इत्यादि प्राचीन स्मृतींत संन्यासाश्रमाचें विस्तारानें वर्णन आहे. पण चार मुख्य व्रतें आहेत तीं हीं कीं परमात्मध्यान, शुचिता, भिक्षा व एकान्ताचा अभ्यास (दक्षस्मृति ७.३८ 'ध्यानं शौचं तथा भिक्षा नित्यमेकान्तशीलता । भिक्षोश्चत्वारि कर्माणि पञ्चमं नोपपद्यते ॥ '). श्री स्वामींनीं यावज्जीव हीं कर्तव्यें अक्षरशः पाळिलीं.

श्री स्वामींचा व माझा प्रथम परिचय केव्हां झाला हें सांगतां येत नाही. पण चौतीस वर्षांपूर्वी अकोला येथें धर्मनिर्णयमंडळाचें (त्याकाळीं तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी परिषद्) अधिवेशन झालें त्यावेळीं रा. आठल्ये वकील यांचेकडे बरेचजण उतरलों होतों, त्यांत स्वामी व त्यांचे शिष्य व मीही होतों, तेव्हापासून दृढ परिचय झाला. त्यावेळीं मी माझ्या धर्मशास्त्रेतिहासाच्या पहिल्या भागाचें लिखाण करीत होतों. तो भाग १९३० मध्यें प्रसिद्ध झाला. त्यानन्तर दुसरा व्हाल्यूम फारच मोठा म्हणजे सुमारें १४०० पानांचा झाला व तो १९४१ सालीं प्रसिद्ध झाला. या काळांत मी स्वामींबरोबर पत्रव्यवहार करूं लागलों. स्वामी 'अपरिग्रह' वृत्तीनें राहात असल्यामुळें मी त्यांनाच विचारून लहान उत्तर असल्यास जोडकार्ड किंवा माझा पत्ता लिहिलेलें पाकीट किंवा तिकिटें पत्रांत घालून पाठवीत असे. अशारीतीनें १९३१ ते १९५४ या चौवीस वर्षांत स्वामींचीं शेंदीडशें पत्रें मला आलीं असतील. तीं सर्व मी ठेविलीं नाहींत; महत्त्वाचीं वाटलीं अशीं वीसपंचवीस पत्रें मजजवळ आहेत. त्यांपैकीं कांहीं पत्रांचा उल्लेख केल्यास स्वामींचा निरलस स्वभाव, जिज्ञासूंचें समाधान करण्याची तत्परता, दुराग्रहाचा अभाव, अलौकिक बुद्धिमत्ता व सौजन्य यांचा अनुभव जो मला आला तो वाचकांनाहि प्रतीत होईल.

मजजवळ असलेल्या पत्रांत सर्वांत जुनें ज्येष्ठ शुद्ध ८ शके १८५७ (सन १९३५) चें आहे. मी मुंबई ब्राह्मणसभेंत सन १९३४ सालीं धर्मशास्त्रावर बरींच व्याख्यानें दिलीं. त्यांचा सारांश माझे स्वर्गवासी विद्वान् मित्र श्री. केशवराव ओगले यांनीं लिहून काढला व तो प्रथम वृत्तपत्रांत प्रसिद्ध होऊन 'धर्मशास्त्रविचार' या नांवानें १९३५ मध्यें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला. त्याची प्रत श्रीस्वामींना पाठवून त्याचा परामर्श घेण्याबद्दल विनंति केली. त्यांतील छपाईच्या व इतर चुका, विवरणें वगैरे स्वामींनीं पाठविलीं व शेवटीं उत्साहवर्धक मजकूर लिहिला तो येथें देतों: "सम्यग्दर्शी, व्यापक व ग्रहणधारणसमर्थ अशी बुद्धि, सतताभ्यास इत्यादि गुणांनीं युक्त अशा व्यक्ति महाराष्ट्रांत अत्यल्प आहेत, त्यांत आपण एक प्रमुख आहांत. थोडक्यांत 'पण्डितो मेधावी' (छान्दोग्य. ६.१४.२) असे आपण आहांत. धर्मशास्त्रविचार हें पुस्तक मी सर्व अक्षरशः वाचलें आहे. तें उत्तम विचारांचें प्रदर्शक व प्रवर्तक आहे आणि वाचनीय व अभ्यसनीय असेंच आहे. असेंच सत्कार्य करण्यासाठीं ईश्वर आपणांस आयुरारोग्य देवो."
ह्या त्यांच्या आशीर्वादानुरूप मला प्रदीर्घ आयुष्य (हल्लीं ८१ वें वर्ष आहे) लाभून धर्मशास्त्रेतिहासाचें लेखनहि बहुतेक पुरें होत आलें आहे. याचवेळीं मी मुख्यत्वेंकरून श्रौतावर सुमारें तीनशें पानें दुसऱ्या भागांत देण्याचें ठरविलें. मला फक्त पुस्तकी-ज्ञान झालें असतें पण दर्शपूर्णमासादि साधीं श्रौतकर्मेंहि मी प्रत्यक्ष पाहिलीं नव्हतीं. त्यामुळें अनेक संशय उभे राहात त्यांचें निराकरण आपुलकीनें कोण करील असा विचार करितां स्वामींना शरण गेलों व त्यांच्या मदतीनें अनेक संशयांचें निराकरण झालें. स्वामींनी मला दर्शपूर्णमास कसे करितात हें सर्व प्रत्यक्ष दाखविलें व सांगली येथें श्रौतसोमयज्ञ (आप्तोर्याम) पशालम्भपूर्वक वे. मू. शंकरभट नातू दीक्षित अग्निहोत्री यांनीं केला. तेथें मला नेऊन तीन दिवस रोज दहाबारा तास याप्रमाणें मला सर्व विधि दाखविले. पुढें अग्निचयनाचे बाबतींत श्येनचिति, कङ्कचिति व त्यांचे प्रस्तर याबाबतींत स्वामींनी स्वतः

अनुक्रमणिका






नकाशे काढून प्रस्तर वगैरे दाखवून मला सर्व समजावून दिलें. ते सर्व नकाशे मी ठेविले आहेत व त्यांतील फक्त एक श्येनचितींतील प्रथम प्रस्तराचा नकाशा माझ्या दुसऱ्या भागांत शेवटीं दिला आहे. त्याच कालांत सामगानाची एक पोथी त्यांनीं मला पाठविली व मी दोन जमविल्या होत्या, त्यां तिहींचा मेळ बसेना तेव्हां मी एक मोठें पत्र लिहिलें त्याचें उत्तर त्यांनी माघ कृष्ण १ शके १८६२ ( फेब्रुवारी १९४१ चें देऊन ) माझी शंका दूर केली. त्यानन्तर मी मुहूर्त या विषयावर वाईस लेख पाठविला. तो सर्व त्यांनीं वाचला व चांगला आहे असें कळविलें. मिताक्षरा ग्रन्थांत 'नोहः' ( न ऊहः ) असें एक वाक्य आहे त्याचा माझा अर्थ त्याना कळवून तो कसा काय आहे असें विचारिलें. माझा अर्थ अयोग्य नाहीं असें त्यांनीं कळविलें.

त्यानंतर बरींचशीं पत्रें ( आज शिल्लक असलेलीं ) सन १९४८ ते १९५० सालचीं आहेत. या सालांत मी धर्मशास्त्रेतिहासाच्या ४ थ्या व्हाल्यूम मधील पातक, प्रायश्चित्त, कर्मविपाक, अन्त्येष्टि, अशौच, श्राद्ध व तीर्थयात्रा या संबन्धानें बरींच पत्रें लिहिलीं. स्वामींनीं इंग्रजीचा अभ्यास केला नव्हता. परन्तु त्यांचीं मतें फार पुरोगामी व न्यायनिष्ठुर होतीं याचा प्रत्यय या पत्रांत येतो. चैत्र शु॥ १० रविवार शके १८७० या दिवशींचें एक लहानसें उत्तर आहे. 'यन्न दुःखेन संभिन्नं' असा एक श्लोक 'स्वर्ग म्हणजे काय' याबद्दल आहे; तो कोठील म्हणून विचारलें, त्याचें उत्तर माहीत नाहीं असें आलें. 'स्वर्गनरकादि कल्पना आतां विसाव्या शतकांत विद्वानांना मान्य होणें शक्य नाहीं. त्याऐवजीं निराळी मांडणी केली पाहिजे' असें मी लिहिलें होतें. त्याला स्वामींनीं स्पष्ट कळविलें कीं, "नरकादिकल्पना साफ सोडून देऊनच विसाव्या शतकांत मांडणी केली पाहिजे हें मला पूर्ण मान्य आहे; आतां त्या पारलौकिक नरकाला कोणी धूप घालणार नाहीं."

या काळांतील फार मोठें एक पत्र आहे. अनेक प्रश्न मी विचारिले होते. त्यांतील एक महत्त्वाचा असा : श्राद्धांमध्यें पिता, पितामह व प्रपितामह या तिघांना उद्देशून पिण्ड द्यावयाचे असतात. तीन पिढ्या म्हणजे सहज ७५।१०० वर्षें होतात. तेव्हां इतकीं वर्षें हे तीन पिढींतील पुरुष सूक्ष्म शरीरानें वास करितात असें धरावें लागतें. पण त्याचे उलट कर्म व पुनर्जन्म हा सिद्धान्त येतो. 'कर्मानुगो गच्छति जीव एकः'. तिघांचीं कर्में भिन्न असणार व ते भिन्न देशांतहि मृत असण्याचा संभव तेव्हां हें पिण्डदान त्यांना कसें पोंचणार असा प्रश्न होता. त्याचें मोठें उत्तर त्यांनीं दिलें. त्यांतील दोन वाक्यें उद्धृत करितों. "श्राद्ध, पिण्डदान, और्ध्वदेहिक या कल्पना जुन्या असून पुनर्जन्माची कल्पना, स्वर्ग, नरक, परलोक या कल्पना नवीन आहेत." "ज्ञानविकासक्रमांतील सर्वच कल्पनांचा संग्रह धर्मशास्त्रामध्यें असल्यानें श्राद्धकल्पना आणि लोकान्तरगमन कल्पना शास्त्रामध्यें संगृहीत आहेत हें खरें."

१९५३ मध्यें माझ्या धर्मशास्त्र इतिहासाचा चवथा भाग प्रसिद्ध झाला. १९५४ पासून पांचवा भाग लिहिण्याचें सुरू केलें. हा फारच मोठा होणार असें दिसूं लागल्यामुळें व मला ७५ वें वर्ष लागल्यामुळें आणि १९५३ च्या नवंबरांत मला प्रेसिडेंट यानी पार्लमेंटांत नियुक्त केल्यामुळें मी एक पत्र लिहिलें कीं वय व कामें पहातां माझ्या हातून हा शेवटचा भाग कसा पुरा होणार याची काळजी वाटते. मी हेंहि कळविलें कीं, १९५४ पासून मी वकिलीचें नवीन काम घेणेंचें बंद केलें आहे पण जुनीं कामें आहेत तीं सर्व चालविलीं पाहिजेत नाहींतर घेतलेली सर्व फी परत केली पाहिजे. तेव्हां काय करावें याचा विचार करीत आहे असें लिहिलें. त्याचें उत्तर कार्तिक पौर्णिमा शके १८७६ ( नवंबर १९५४ ) चें आलें; त्यांतील एकच वाक्य देतों : "आपल्या धर्मशास्त्राचा पांचवा भाग पुरा झाला पाहिजे.











पार्लमेंटच्या राजीनामाहि द्यावा पण ५ वा भाग झालाच पाहिजे. " त्यांच्या विचाराप्रमाणें पार्लमेंटचा राजीनामा मला राष्ट्रीय प्राचार्य नेमल्यामुळें सप्टेंबर १९५९ मध्यें मी दिला व पांचव्या भागाचेंहि काम ( लेखनाचें ) एक लहानसा ( पन्नास पानांचा ) भाग वगळून पूर्ण झालें आहे. छपाईला काय वेळ लागेल सांगतां येत नाहीं.

आम्हां महाराष्ट्रीयांना स्वतःची जाहिरात उत्तम रीतीनें आजपर्यंत करितां येत नसे. आतां पुस्तक-प्रकाशन, नाटकें, गोष्टी वगैरे बाबतींत आमचे लेकांना जाहिरात कशी करावी हें हळुहळू साधूं लागलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. पण आपल्यांतील थोर महाराष्ट्रीय पुरुषांबद्दल आदर व भक्ति याचें प्रदर्शन योग्य प्रकारें होत नाहीं, दोषैकदृष्टि जास्त दिसते. बंगालमधील रामकृष्ण परमहंस व विवेकानन्द, रवीन्द्रनाथ ठक्कुर व त्यांचे ग्रन्थ, दक्षिणेंतील अरुणाचलावरील रमण महर्षि यांना ज्या प्रकारची प्रसिद्धि स्वकीयांकडून व परकीयांकडून लाभली तशी प्रसिद्धि स्वामींना लाभली नाहीं.

स्वामींचें वर्तन निस्पृह व प्रसिद्धिपराङ्मुख होतें. या बाबतींत योग्यांचे बाबतींत जे नियम सांगितलेले आहेत ते स्वामी मनांत वागवून पाळीत असें वाटतें. " योगसिद्धीचे वाटेंत संमानना फार हानिकर आहे म्हणून सामान्य लोकांकडून अवमानित जो योगी त्याला योगसिद्धि प्राप्त होते. सत्पुरुषांनी घालून दिलेल्या धर्माच्या विरुद्ध न जातां योगी असें वर्तन करतो कीं ज्यामुळें सामान्य जनांत तो अवमानित होईल आणि सामान्य जनांशीं संगतीहि करीत नाहीं " ( विष्णुपुराण, अंश २ ; अध्याय १३.४२–४३ ).

प्राचीनकाळीं वसिष्ठांसारखे तपोनिष्ठ व शान्तदान्त ऋषि होते असें आपण वाचतों; पण आधुनिक काळींहि तशा प्रकारचे पुरुष असूं शकतात असें रामकृष्ण परमहंस, रमण महर्षि यांच्याबद्दल स्वकीयांनीं व परकीयांनी लिहिलें आहे. त्याच योग्यतेचें स्वामींचें सर्व आयुष्य होतें असें लिहिण्यांत मला कोणत्याहि प्रकारचा संशय किंवा संकोच वाटत नाहीं.

---










श्री. महादेवशास्त्री दिवेकर

# श्रीकेवलानंद स्वामी यांचें वेदान्तविचार

## श्रीमत् परमहंस परिव्राजक–

श्री पं. नारायणशास्त्री मराठे यांनीं चतुर्थाश्रम स्वीकारल्यावर व प्रस्तुत लेखक हा मिरजेस आल्यावर श्री स्वामीमहाराजाशीं त्याचा अनेक विषयांवर पत्र-व्यवहार होई. त्यांचीं अनेक पत्रें तत्त्वज्ञान, अद्वैत-वेदान्त व तत्संबद्ध विषयावरचीं आहेत. त्यांतील कांहीं पत्रांतील सिद्धान्त त्यांच्याच शब्दामध्यें सादर करितों. बहुतेक पत्रावर तिथी व शक आहे. कांहीं पत्रांवर केवळ पोस्टाचा शिक्काच दिसतो. कांहीं पत्रावरील लिफाफे जीर्ण होऊन गेल्यामुळें कांहीं पत्रावर ना तिथी, ना शक, ना पोस्टाचा शिक्का अशी वस्तुस्थिति आहे. सर्व पत्रें ते स्वतःच लिहीत व प्रत्येक पत्रावर स्वाक्षरीहि आहे. हीं सर्वच पत्रें आम्ही स्वामींचे चरित्रकार श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचेकडे पाठविणार आहोंत. स्वामींचा हा पत्रव्यवहार योग्य ठिकाणीं व सुरक्षित ठेवण्यास तेच एक समर्थ शिष्य आहेत.

### गुरु–अनुग्रहाची पूर्वपीठिका

श्री केवलानंद स्वामी हे श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ होते. अद्वैतवेदान्ताचे ते पुरस्कर्ते, प्रस्थानत्रयीचा अखंड पाठ चालू ठेवणारे एकनिष्ठ आचार्यभक्त होते. त्यांची परंपराहि उज्ज्वल आहे.

सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वी वाई क्षेत्रांत श्रीमत् परमहंस रामानंद तथा वेणीमाधवस्वामी या नांवाचे एक अत्यंत विद्वान्, विरक्त, ब्रह्मनिष्ठ थोर पुरुष होऊन गेले. त्यांनीं ब्रह्मावर्तास जाऊन वेदान्ताचें अध्ययन केलें होतें. त्यांचा शिष्यसंप्रदायहि बराच मोठा होता. त्यापैकीं श्री ब्रह्मानंद व भूमानंद या शिष्य-द्वयांनीं वैराग्य व विद्वत्ता यामध्यें गुरुतुल्य लौकिक मिळविला. वाईमध्यें मधल्या आळींत वेणीमाधवांचें पट्टाभिराममंदिर आहे तेंच त्यांचें स्मारक होय.

श्रीब्रह्मानंदांचे शिष्य श्रीप्रज्ञानंद स्वामी सरस्वती हे होत. ते पूर्वाश्रमी वैदिक व शास्त्री होते. उपनांव परांजपे. श्रीप्रज्ञानंद स्वामींचा प्रस्थानत्रयीचा व्यासंग एवढा दांडगा होता कीं त्याकाळीं उभ्या महाराष्ट्रांत त्यांच्या तोडीचा विद्वान् नव्हता. त्यांनीं आजन्म सकाळीं ९॥ ते ११ पर्यंत शुचिर्भूतपणानें प्रस्थानत्रयीची पाठ-परंपरा चालविली. श्रवणास येणाऱ्या सर्वांनाच सोव-ळयानें येण्याचा दंडक असे. श्री. मराठेशास्त्री यांचें अन्य विद्वान् गुरुकडे वेदाध्ययन, शास्त्राध्ययन झाल्या-वर तेहि या वेदान्ताच्या पाठास उपस्थित होऊं लागले. बऱ्याच वर्षानंतर शिष्य नारायणाची बुद्धिमत्ता, वैराग्य व विद्वत्ता ही पाहून श्रीप्रज्ञानंदस्वामी हे त्यावर प्रसन्न झाले व एके दिवशी असाच प्रसन्नतेचा प्रसंग साधून त्यांनीं या नारायणास 'आमच्या पश्चात् तूं हा पाठ चालीव' असें म्हणून त्याच्यावर अनुग्रह केला. तेव्हांपासून तों सन १९५५ च्या मार्चच्या १ तारखेपर्यंत श्री केवलानंदांनीं अद्वैत वेदान्ताची आचार्यप्रणीत परंपरा चालविली. अशा या श्रेष्ठ अधिकारी पुरुषाचे विचार मुमुक्षूंना–साधकांना मार्गदर्शक होतील म्हणून ते त्यांच्या पत्राधारें येथें देतों.

### अध्यासभाष्यावरील अभिप्राय

अद्वैतवेदान्ताचें बीज अध्यास भाष्यांत आहे. ज्याला ब्रह्मसूत्रभाष्यांतील अध्यासभाष्य समजेल, त्यालाच अद्वैतवेदान्ताचें यथार्थ आकलन होईल. ज्याला शांकरतत्त्वज्ञानाचें खंडण करावयाचें असेल, त्यानें फक्त अध्यासभाष्याचें खंडण करावें व दिग्विजयी व्हावें. श्री स्वामीमहाराज १९५२ सालीं येथें आल्यावेळीं ८ दिवस त्यांच्या सहवासाचा लाभ झाला. त्यावेळीं येथील वेदान्तप्रेमी कांहीं जिज्ञासूंशीं आमच्या घरींच त्यांची चर्चा झाली. त्या चर्चेमध्यें त्यांनी विशिष्ट सिद्धान्त सांगितले ते मी प्रथम माझ्या टिपणावरून देतों.

अध्यासभाष्यांत सर्वमान्य व्याख्या दिली आहे. "अतस्मिंस्तत् बुद्धिः" तसें नसतांना तसें भासणें हा



अनुक्रमणिका








अध्यास म्हणजेच भ्रम होय, या अध्यासाचे कार्याध्यास व कारणाध्यास असे दोन प्रकार आहेत. कार्याध्यासांतहि कांहीं प्रकार आहेत; पैकीं स्वामींनीं दोनच सांगितले : (१) स्वरूपाध्यास— आरोप्याचा (सर्पाचा) अधिष्ठानावर म्हणजे रज्जूवर जो अध्यास तो स्वरूपाध्यास होय. कारण येथें सर्पाचें स्वरूप कल्पित असतें. (२) संसर्गाध्यास–अधिष्ठानाचा (रज्जूचा) आरोप्यावर (सर्पावर) जो अध्यास तो संसर्गाध्यास होय. या ठिकाणी अधिष्ठान जी रज्जु ती कल्पित नसते पण कल्पित जो सर्प त्याच्याशीं अधिष्ठानाचा आधाररूपानें जो संबंध (संसर्ग) तो संसर्गाध्यास होय. येथ संसग कल्पित असतो.

## परमात्मा–साक्षी

परमात्मा हा सर्वसाक्षी असला तरी त्याच्या स्वरूपांबद्दल स्वामीजी श्रावण कृष्ण १४ रविवार शके १८७५ चे पत्रांत लिहितात. साक्षीलाहि कांहीं उपाधी असतात. तो नाहिसा झाला की आभास आपोआप अभिन्न होतो. आभासाच्या आवरणाचा निराळा निरास करावा लागत नाहीं. (साक्षी म्हटला की त्यालाहि कांहीं साक्ष्य असावें लागतें म्हणजे तोहि शब्द सापेक्षच असतो.) कंसांतील स्पष्टीकरण लेखकाचें समजावें.

## मायावाद हा श्रुतिसिद्ध व तर्कसिद्ध आहे

"मायां तु प्रकृतिं विद्धि मायिनं तु महेश्वरम् ॥ या श्वेताश्वतर श्रुती प्रमाणें मायावाद श्रुतिसिद्ध आहे. कांहीं सिद्धान्त श्रुतिसिद्ध तर कांहीं सिद्धान्त युक्तिसिद्ध असतात. माया ही स्वाश्रया व स्वविषया असें म्हणतात. स्व = चैतन्य होय. (माया ही चैतन्याच्या–ब्रह्माच्याच आश्रयानें असते म्हणून तिला स्वाश्रयत्व आहे व ती त्याच परब्रह्माला विषय करिते म्हणजे झाकते म्हणून तिला स्वविषयत्वहि आहे).

मिरजेंतील चर्चेमध्यें स्वामींनीं तर्कदृष्ट्या मायावादाची मांडणी केली ती अशी :

## तर्कदृष्ट्या मायावादाची सिद्धि

मायावादाला तीन गृहीत कृत्यें व तीं तर्कशुद्ध मानावीं लागतात (१) ज्याला कांहीं कारण नाहीं असें एक मूलतत्त्व आहे. उदा. परमाणु. (२) दोन परमाणु संयुक्त झाल्यावाचून जगताला आरंभ नाहीं. परमाणूला तर बाजू नाहींत व बाजूशिवाय संयोग नाहीं. (३) परमाणूच्या ठिकाणींच शक्ति मानावी लागते. शक्ति व शक्तिमान् यांचा भेद आहे कां अभेद आहे? तर त्याचें उत्तर अनिर्वचनीय हेंच आहे. जगत् कारणाचा विचार वेदान्तशास्त्रानें मोठा मार्मिक केला आहे. त्यासंबंधीं कार्तिक व॥ ३० शके १८७५ च्या पत्रांत स्वामी लिहितात :

## जगत्कारणविचार

(१) जगताचें कारण ब्रह्मच पण मायाद्वारां अवांतर मतें बरींच आहेत. शुद्ध ब्रह्म हें जगताचें कारण हा पक्ष ज्ञानेश्वरांच्या चिद्विलास पक्षासारखाच म्हणायाचा ! 'देवोदेवीं एकच तत्त्व, ज्ञानेश एकच तत्त्व मानतात'. तसें माया (तत्त्वहि) ब्रह्मान्तर्गतच. कांहीं झालें तरी मायाशक्ति मानूनच ब्रह्माला जगत् कारणत्व येतें. "सर्वं खलु इदं ब्रह्म" हाच शेवटीं सिद्धांत ... मतें कांहीं एकेका कल्पनेवर आधारलेलीं असतात. त्याच पत्रांत आणखी एका प्रश्नाचें उत्तर आहे.

(२) वेदान्तशास्त्रानें ६ गृहीतकृत्यें मानून जगताचें कोडें सोडविण्याचा यत्न केला. ती गृहीत कृत्यें अशीं– जीवईशो विशुद्धाचित् तथा जीवेशयोर्भिदा । अविद्या तत्चितोर्योगः षडस्माकमनादयः ॥ (१) जीव (२) ईश्वर (३) विशुद्धचैतन्य (४) जीव व ईश्वर यांचा भेद (५) अविद्या (६) तिचा चैतन्याशीं संबंध हीं आमचीं अनादि ६ गृहीतकृत्यें होत. पण हा श्लोक कुणाचा? या प्रश्नाचें उत्तर– "हा श्लोक कोणाचा हें (निश्चित) माहित नाहीं. तथापि सुंदर पांड्य म्हणून प्राचीन वार्तिककार होते, त्यांचा तो श्लोक असावा."

## उपासना विचार–

(श्रावण वद्य १४ रविवार शके १८७५)

"मांडूक्यात ॐकारोपासना जीवब्रह्मैक्यरूप आहे. सगळ्या अहंग्रहोपासना 'अहंब्रह्मास्मि' रूप नसतात तथापि उपास्य व उपासकाचा अभेद त्यांत विवक्षित असतो.

शांडिल्योपासना— (छांदोग्य ३।१४ 'एतमितः प्रेत्याभिसंभवितास्मि) यावरून अहंग्रहोपासना आहे.

उपकोसलविद्या– छांदोग्य ४।१० ते १५ यामध्यें 'एष आत्मा' असें म्हटलें आहे.








वैश्वानरविद्या—छांदोग्य ५।११–१८ ‘को न आत्मा, किं ब्रह्म’ असा उपक्रम आहे.

दहरविद्या-- छांदोग्य ८।१-३ यामध्यें ‘एष आत्मा, इति होवाच’ इत्यादि आहेत. तात्पर्य सगळ्या अहंग्रहोपासना अशाच आहेत. ”

## जीवस्वरूपविचार

“ अवच्छेदवाद, आभासवाद व प्रतिबिंबवाद असे तीन वाद जीवाचें स्वरूप सांगण्याकरिता वेदान्तशास्त्रानें स्वीकारले आहेत त्यासंबधीं श्री स्वामीजी सोमवती अमावास्या चैत्र शके १८७५ चे पत्रांत लिहितात. रूपवानाचेंच प्रतिबिंब पडतें, असा नियम करतां येत नाहीं. ब्रह्म रूपरहित असलें तरी प्रतिबिंब संभवतें. निरवयवाचें प्रतिबिंब नसतें असाहि नियम नाहीं. निरवयव आकाशाचें प्रतिबिंब पडतें. तसेंच ब्रह्माचें असेल. अद्वैतसिद्धि, कल्पतरु व परिमल या ग्रंथामध्यें व टीकामध्यें याचें विस्तृत विवेचन आहे. ”

साधकाकरितां जीवन्मुक्तिविवेक हा ग्रंथ कसा आहे असें विचारलें असतां विद्यारण्यकृत ‘जीवन्मुक्तिविवेक’ हा ग्रंथ चांगला आहे, असें ते २९-११-५३ च्या पत्रांत लिहितात. तसेंच ८-७-५३ च्या पत्रात ते दक्षिणामूर्ति संबंधी लिहितात. ‘दक्षिणामूर्ति’ (स्तोत्रविषय) साक्षात् शंकराचाच एक अवतार किंवा साक्षात् दक्षिणाभिमुख शंकरच आहेत. गुरुपरंपरेंतील व्यक्ति नव्हें. तंत्रशास्त्रामध्यें ‘दक्षिणामूर्ती’चें स्वतंत्र प्रकरणच आहे. अर्थात् चरित्रकोशामध्यें (दक्षिणामूर्ति) हें नांव मिळणें शक्य नाहीं.

## ब्राह्मणाचें लक्षण

श्री स्वामीजींचा पंचाहत्तराव्वा वाढदिवस फारच प्रभावीपणें साजरा झाला. अनेक सुहृदांचीं गुणवर्णनपर भाषणें झालीं. स्वामीजींनीं सत्कारोत्तर उत्तरार्थ केलेल्या आपल्या भाषणांत विनयानें अनेक गोष्टींचा उल्लेख केल्यानंतर आपल्या जीवनाचें ध्येय सांगितलें तें असें-

“ तस्मात् ब्राह्मणः पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्, बाल्यं च पांडित्यं च निर्विद्य अथमुनिः अमौनं च मौनं च निर्विद्य अथ ब्राह्मणः” (बृहत् आरण्यक ८३।५।१) मी यासंबधीं लिहिलेल्या पत्रास ते उत्तर देतात (१६।७।५३) पांडित्यं = अनेकविधज्ञानं निर् = निःशेषं विद्य = लब्ध्वा (अनेक प्रकारचें ज्ञान पूर्णपणें संपादून) बाल्येन = बालस्य भावः = कामक्रोध मायामत्सरादि शून्यत्वम् तेन (कामक्रोधलोभमत्सरशून्य असा स्वभाव तो बालभाव). यापदाचें विवरण (ब्र. सू. ३।४।५०) वरील भाष्यांत पाहावें. तेथें भाष्यकार म्हणतात, ज्ञानाध्ययन धार्मिकत्वादिभिरात्मानमविख्यापयन् दंभदर्पादि रहितो भवेत्- ज्ञान, अध्ययन, धार्मिकत्व इत्यादींनीं स्वतःची प्रसिद्धि न करितां दंभदर्परहित असावें. मौनं = सततं विचारशीलता, मितभाषित्वं च (सतत विचारशील असणें, व मितभाषण करणें). वरील प्रमाणें पांडित्य, बाल्य, व मौन हीं पूर्णपणें प्राप्त करून जो घेतो तो ब्राह्मण होय. पांडित्यं बाल्यं मौनं च येन पूर्णतया लब्धं स ब्राह्मणः ब्रह्मनिष्ठो ब्राह्मणः ॥

ज्ञान अनंत आहे. कारण जग अनंत आहे. तथापि यथाशक्ति जास्तीत जास्त ज्ञान मिळवावें. पांडित्य-बाल्यसंपादन = विद्याविनयसंपन्नता. मौन-वाचाळपणा नसावा. वादविवाद करूं नये. ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण असा असतो, असें माझ्या भाषणांतील विवरणाचें तात्पर्य होतें. (येथें श्री स्वामीमहाराजांनीं वरील तीन शब्दांच्या स्पष्टीकरणाचे निमित्तानें आपलें चरित्र, नेहमीच्या स्वभावाचा स्थायीभाव सांगितला आहे.)

बृहदारण्यकांतील वरील श्रुतीमध्यें ‘अमौन’ असा शब्द आहे. त्याचें स्पष्टीकरण त्यांनीं दुसऱ्या एका पत्रांत केलें आहे (आषाढी एकादशी १८७५) अमौन शब्दानें मौनभिन्न पांडित्य, बाल्य असा अर्थ घेणें, अमौनं = मौनभिन्नं पांडित्यं बाल्यं, पांडित्य = श्रवण, बाल्य = मनन, मौन= निदिध्यासन, ध्यान, असाहि भाष्यवार्तिककारांचा अर्थ मान्य आहे.



अनुक्रमणिका






श्री. द. वें. केतकर

# ज्ञानेश्वरीविषयक अवशिष्ट संशोधन

( १ ) वाचकांच्या सोयीकरितां अल्पसा आढावा —

ज्ञानेश्वरीच्या शुद्धीकरणांत श्री. एकनाथांनीं स्वतःच्या ओव्या घुसडल्या, स्वकालिक प्रयोग उपयोजिले, ओव्यांचें सुलभीकरण केलें, वगैरे—मोठमोठ्या विद्वानांनीं केलेले हीन आरोप वाचण्यांत आले. त्या आरोपांच्या–निर्मूलनार्थ **नाथ-ज्ञानेश्वरीची लोकमान्य नक्कल झालीच नाहीं** हा लेख लिहिला. (पहा-नवभारत आक्टोबर १९५८),

**दुरुस्ती**— वरील नवभारत पृ. ४४ क्र. २३ मध्यें, माडगांवकरांनीं पैठणहून आलेली एकनाथस्वामींच्या मठांतील पोथी श. १५५१ अशी निर्देशिलेली प्रत व सांप्रत श्री. न. र. फाटक यांचे ताब्यांत असलेली पोथी-ह्या एकच होत-हें आमचें विधान चुकलें आहे. या दोन्ही प्रति भिन्न आहेत.

( २ ) "**ज्ञानेश्वरीचा अभ्यास**" -- या श्री. केळकरांच्या ग्रंथांतील निवडक ५५ ओव्यांची अर्थ-चर्चा वाचली. अनाठायी पाल्हाळ, निष्कारण काथ्याकूट, अप्रस्तुत काटेकोरपणा, ओवींतील केन्द्रकल्पनेचें अन्यथाज्ञान, गंभीर तत्त्वांचें अगंभीर विवरण, व्यापक प्रमेयांचें संकुचित मापन, व तज्जन्य असंबद्ध नवीन पाठसंसूचन, वगैरे प्रदीर्घ व्यासंगाला न शोभणारी ओव्यांची मोडतोड--पाहिली. विशेषतः निराधार अर्थांचा धृष्ट पुरस्कार अत्यंत असमंजस वाटला. अभ्यासाचा असला चुकीचा मार्ग टळावा म्हणून--

( अ ) नवभारत, नोव्हेंबर १९५८

( ब ) नवभारत जानेवारी १९५९

( क ) नवभारत फेब्रुवारी १९५९

या तीन अंकांत, त्याच ५५ ओव्यांच्या अर्थचर्चेच्या द्वारें योग्य मार्ग दाखविण्याचा यत्न केला. या यत्नांत कांहीं अति गंभीर, कांहीं गंभीर, कांहीं अक्षम्य, असे तीस पस्तीस चुकीचे अर्थ दाखवावे लागले. ते सारे अन्तिम लेखाच्या शेवटीं श्री. केळकरांच्या नजरेस घातलेहि. तरीदेखील श्री. केळकरांनीं त्या संबंधानें एका अवाक्षरानेंहि विचारपूस केली नाहीं. आपल्या "अभ्याससंबंधानें" कोणी कांहींच लिहिलें नाहीं --अशा भावनेनें त्यांनीं मौनच पाळिलें. वास्तविक पहातां, त्यांनीं थोडीशी चर्चा करण्याचा हा प्रसंग होता. पण त्यानीं तो बुद्धिपुरस्सर टाळलेला दिसतो.

( ३ ) "ज्ञानेश्वरीची ओवी संख्या" या पुस्तिकेंतहि बरींच स्खलनें आढळलीं तीं टळावीं म्हणून—

( अ ) नवभारत जून १९५९

( ब ) नवभारत जुलै १९५९

( क ) नवभारत ऑगस्ट १९५९

—या तीन अंकांत "ज्ञानदेवी टीकासंख्या ९००९" याची साधार मांडणी केली. श्री. केळकरांच्या निराधार ८९८२ व आमच्या साधार ९००९ ओव्या–यांत २७ ओव्यांचें अंतर आहे. या २७ ओव्यांत लुप्तोपलब्ध, ज्ञानदेव मुद्रांकित, हस्तलिखित निविष्ट १३ ओव्या समाविष्ट आहेत. आश्चर्य असें कीं–या तीन लेखांसंबंधीहि श्री. केळकर यांनीं पूर्ण मौनच पाळिलें. आमच्यामतें त्यांनीं अल्पसा विचारविनिमय करावयास पाहिजे होता. त्यायोगें अधिक प्रकाश पडला असता. परंतु श्री. केळकर यांस काय वाटलें कोणास ठाऊक !! ओवीसंख्येच्या बाबतींत प्रयत्न करणारे श्री. केळकर व केतकर हे






दोघेच. ग्राह्याग्राह्य ठरविलेल्या ओवींच्या बाबतींत आम्हां उभयतांचा विचार विनिमय उपयुक्त ठरला असता. परस्परांची चिकित्सेची सरणी स्पष्टतरपणें समजली असती. पण श्री. केळकरांनीं विचारविनिमयाचा दरवाजा उघडलाच नाहीं. आम्हांला हें त्यांचें वर्तन फारच विलक्षण वाटलें. कारण खरा संशोधक विचारघर्षणाची वाट पहात असतो, व प्रसंग येतांच आखाड्यांत प्रवेश करितो. ती चळवळ श्री. केळकर यांच्यात तिळमात्रसि दिसून आली नाहीं असो.

( ४ ) त्यानंतर– ज्ञाने० अ० ९ ओ० ४०१; अ० १५, ओ० २३६; अ० १५. ओ० २४४; अ० १३ ओ० १०५; अ० १३, ओ० ११६९; या पांच ओव्यांच्या अर्थाची चर्चा —

नवभारत डिसेंबर १९५९

– या अंकात केली.

( ५ ) त्यानंतर– " गीतेंतील एक विरोधाभास "– हा लेख

नवभारत फेब्रुवारी १९६०.

या अंकात प्रसिद्ध करून ( गीता. अ० ४ श्लो० १७ " विकर्म " या शब्दाचा ज्ञानेश्वरांनीं केलेला व श्री शंकराचार्यांनीं केलेला जो अर्थ त्यांत विरोध नाहीं– हें दाखविलें.

( ६ ) त्यानंतर– " ज्ञानेश्वरीनिविष्ट कानडी-प्रचारांतील शब्द " हा अत्यंत अवश्य असा लेख–

नवभारत एप्रिल १९६०,

–या अंकांत प्रसिद्ध करून ८२ कानडी शब्दांचा संग्रह मांडिला. आणखी फारतर १०, १५ सांपडतील.

( ७ ) त्यानंतर– " कालिदासकाल इ. स. २००–३०० "– या माझ्या निर्णयाला विरोध करण्याकरितां, साप्ताहिक स्वराज्यांत तीन आक्टोबर १९५९ च्या अंकापासून एकंदर बारा लेख ज्यो. ढवळे यांनीं प्रसिद्ध केले. परंतु त्यांच्या लेखांतीलच, अन्तिमसारभूत अशा त्यांच्याच निर्णयद्वारें " केतकरांचाच काल इ. स. २००–३०० " निर्विवाद्यपणें सिद्ध करणारा लेख,

नवभारत मे १९६०

– या अंकांत प्रसिद्ध केला, असो. प्रस्तुत :—

( ८ ) आतां आम्हीं कांहीं अवशिष्ट संशोधनें येथें मांडीत आहोत. तीं वाचकांनीं शांत चित्तानें वाचावींत.

### विखुरलेलीं जुनीं संशोधनें

( ९ ) प्रथम कांहीं इकडे तिकडे विखुरलेलीं जुनीं संशोधनें एकत्र करण्याकरितां येथें देतो. त्यायोगें वाचकांची मोठीच सोय होणार आहे. शिवाय, तीं संशोधनेंहि अत्यंत महत्त्वाचीं आहेत. संशोधनानाचें स्वरूपहि वाचकांचें मार्गदर्शन करील.

( १० ) खालीं दिलेल्या या जटिल प्रश्नांचा विचार करायचा कोणींच यत्न केलेला नाहीं. श्री. केळकर, श्री. वि. प्र. लिमये – श्री. मंगरूळकर, यांच्याहि नजरेस हीं स्थळें कशीं आलीं नाहींत कोण जाणे ! ! म्हणून तीं सर्व स्थळें पुनः एकदां विद्वानांच्या समोर मांडीत आहे. टीपकारांनी सुचविलेल्या कल्पना वाचल्या म्हणजे मनाची अनिवार्य गजबज होते, व वाटतें कीं – कशाकरितां ही एवढी आकाशपाताळी भ्रामक खटपट ! ! !

### शोध १ ला; हरिमेखळा

( दैनिक काळ– ११।१०।१९५३ यांत छापलेला आमचा लेख. )

**ऐसेनि स्थितीचिये वेळे :**
**भुलवी अज्ञानाचे डोळे ।**
**लाघवी हरिमेखळे : लोकु जैसा ।**
**ज्ञाने० १५।२४१**

( ११ ) ज्ञानेश्वरीच्या एकनाथोत्तर कालीन सर्व मुद्रित व हस्तलिखित, प्रतींत हा शब्द–हरी मेखळा--असा तोडला आहे, इतकेच नव्हे तर हरी

असा दीर्घ लिहून-- हरी = हरण करतो--असा अर्थ दिला आहे. तसेंच मेखळा म्हणजे नट--वेष असा अर्थ दिला आहे. पण तो बरोबर नाहीं, असें संशोधनाच्या अंतीं कळून आलें.

( १२ ) महिपति देखील भक्तिविजयांत लिहितात—कोठें संतांच्या पादुका घरी । लाघवी हरी तेथवां ।। ७।१२८ ।। कोणा पुढें लाघवी हरी । गायन करी संगीत ।। ७।१३६ ।। या ओव्यांत महिपतीनें, हरी = श्रीकृष्ण, असा अर्थ केला आहे. ज्ञानेश्वरीच्या प्रस्तुत ओवींतील—लाघवी हरिमेखळे—या तिसऱ्या चरणांतील लाघवी हरी हे दोन शब्द महिपतीनें– गारुडी श्रीकृष्ण– या अर्थानें घेतले आहेत. परंतु संशोधनांनीं हेंहि विसंगतच ठरतें. कारण मूल शब्द "हरिमेखळा" असा संयुक्त शब्द आहे.

( १३ ) हरिमेखळा हा शब्द शुद्ध संस्कृत असूनहि कोठेंहि आढळला नाहीं. श्री **ज्ञानेश्वर व चोंभा कवि** या दोघां शिवाय इतर मराठी कवींनींहि कोठें वापरलेला आढळला नाहीं. वर दिलेला अर्थ मनाला पटेना, म्हणून संशोधन सुरू केलें.

( १४ ) अ० १५, ओवी २४० मध्यें, इंद्रधनुष्याची उपमा दिल्यावर, या २४१ व्या ऐसेनि स्थितीचिये वेळे । भुलवी अज्ञानाचे डोळे । लाघवी हरिमेखळे । लोकु जैसा ।। – ओवीत लाघवी म्हणजे "गारुडी" या शब्दावरून हरिमेखळा म्हणजे "गारुड" किंवा "इंद्रजाल" हा अर्थ सुचला. पण तो खरा कशावरून ? म्हणून संशोधन पुढें चालू केलें.

( १५ ) हरि म्हणजे सिंह. जसें–गिरीकुहरिं हा निद्रित हरि. मेखळा म्हणजे स्त्रियांचा कमरपट्टा. पुरुषांच्या बाबतींत मेखळां = करगोटा, कमरबंध शेला, पांघरावयाचें प्रावरण (भा. रा. पृ. ६९१।४१). योगीजनांच्या बाबतींत मेखळा = गुंडाळावयाचें भगवें वस्त्र, पांघरावयाचें भगवें वस्त्र, रात्रीचें समाधीवरील आच्छादन, आसनाचें किंवा पांघरावयाचें मृगचर्म, व्याघ्रचर्म, सिंहचर्म, यानांहि मेखळाच म्हणतात. पहा--मृगचर्मांची शोभली मेखळा । का.खं. ५५।११. आसनोपयोगी चर्माला व्याघ्रसिंहाचें जबड्यासह-तोंड, नखांसह पंजे व चवडे, व शेपटी वगैरे राखून ठेविले असतात. म्हणून हरिमेखळा = सदंष्ट्र-मुख, पंजे चवडे, व शेपटी यांनीं युक्त सिंहचर्म असा व्युत्पत्तिसिद्ध अर्थ. हा मेखळेचा सिंह (पेंढा भरून उभारलेला) अज्ञानी प्रेक्षकांना भुलवतो. आपण खरा सिंह आहों-असें "अन्यथाज्ञान" प्रेक्षकांत निर्माण करितो म्हणून हरिमेखळा – अन्यथाज्ञान हा अर्थ होतो. माया वंचना, इंद्रजाल, प्रेक्षकांचें दृष्टिबंधन, हे अन्यथाज्ञानाचेच पर्याय शब्द होत. या अर्थाला **स्वानुभवदिनकरांत** आधार सांपडतो. तो असा – तेवि अन्यथा ज्ञानासी नामाभिधान । मेखळेचा सिंह विराजमान । अत्यंत आवेशें चवडा उभारी गुण–। पराक्रम विवर्जित ।। ४५ ।। पृ. २९२ या ओवींत--

**मेखळेचा सिंह = हरिमेखळा = अन्यथाज्ञान**

असें स्पष्ट सांगितलें आहे.

( १६ ) **दुसरा अर्थ**–हरि = इंद्र, मेखळा म्हणजे– ( मेखलाजिनदंडभृत् ) – या यतिवेषापैकीं एक प्रमुख दृश्य चिन्ह. यावरून हरिमेखळा = इंद्राची मेखळा = इंद्राचा कपटवेश, इंद्राच्या या मेखळादि कपटीवेशानें = इंद्रजालानें = हरिमेखळेनें अज्ञानी अहिल्येचे डोळे भुलविले व आपण गौतममुनि आहो असें तिला भासविलें. सारांश हरिमेखळा=इंद्रजाल दृष्टिबंधन, हा शके १६७१ च्या हस्तलिखित पर्याय शब्दांतील अर्थ बरोबर ठरतो. निष्कपट यतिवेषांतील मेखळा, केवळ मेखळा या नांवानेंच प्रसिद्ध आहे. परंतु इंद्राच्या कपटी वेषांतील ही मेखळा इंद्रमेखळा= हरिमेखळा ही त्याच्याच नांवानें प्रसिद्धीस आली हें योग्यच झालें.








(१७) याला मुख्य आधार— **चौंभा कवि** म्हणतो– कैसें न कळे हरिमेखळ । केलें संधान अनुध्यें । बाणीं भरलें अंतराळ ॥ ५४ ॥ अर्थ– अनिरुद्धानें काय हरि मेखळ (इंद्रजाल) केलें कोणास ठाऊक. वीरभद्राचा हल्ला तर त्यानें सहन केलाच, उलट अनिरुद्धानेंच सर्व अंतराळ बाणांनीं भरलें !! या उताऱ्यांत हरि मेखळा=इंद्रजाल हा अर्थ स्पष्ट आहे.

(१८) कानडी काव्यांतील आधार— **मुद्दण्णा** नामक कवीच्या **रामाश्वमेधकाव्यांत**— इदेनी पश्चिमानिलन हरिमेखळे— म्हणजे, या पश्चिम-दिशेच्या वायूचे काय हो इंद्रजाल हे !! तो येतांच सगळया कळया भराभर उमलल्या. नागवेलींच्या सुरळया उलगडूं लागल्या– वगैरे.

(१९) **कुमार व्यासकृत कर्णाटक महाभारतांत** (पृ. २४५)– सुळिदु हरिमेखळेय मोहर दोळगे मुग्गिदरै—म्हणजे भीम म्हणतो, "शेवटीं या चक्रव्यूहाच्या इंद्रजालांत अडकलांत ना ?" अहो, गारूड=इंद्रजाल, आहे हें !

(२०) पुनः पद्य ११ मध्यें– बल्ले नातन बलुहुनीश्वरनल्ली हरिमेखळेये साकु म्हणजे धृष्टद्युम्न म्हणतो "अर्जुना मला द्रोणाचें बल माहित आहे. अर्जुना तुझ्यापुढें त्याचा काय पराक्रम ! तूं खरा क्षत्रिय, तो ब्राह्मण क्षत्रिय. अरे मायापति जो ईश्वर, त्याच्यापुढें जशी माया (इंद्रजाल) तसा हा त्याचा पराक्रम आहे.

(२१) पुनः कर्णपर्वात, पद्य २२ मध्ये— एलेले हारुवनेके हरिमेखळेय केळिके एके । पडिमद्ळेय बडिकर बिंकमेळविल्लला निनगे ॥ २२ ॥ म्हणजे भीम म्हणतो– अबब्ब, अश्वत्थाम्या, या तुझ्या गारुडाला ढोलवाद्याचीच फक्त जोड नाहीं ही एकच उणीव आहे. अर्थात् हरिमेखळा म्हणजे गारूड, इंद्रजाल हा अर्थ स्पष्ट आहे.

(२२) होयसळ सोमेश्वराजाच्या (इ. स. १२४३-१२५४) कारकीर्दीतील मल्लिकार्जुनाचा पुत्र **केशिराज** कवीच्या **शब्दमणिदर्पण** ग्रंथाच्या शेवटी **प्रयोगसार** नामक ९ व्या अध्यायांत, **स्वपूर्व** कवींद्रोपयुक्त शब्दांच्या अर्थनिर्णयांत— **हरिमेखळेयेंदु इंद्रजालम्**– असा अर्थ दिला आहे.

**या दीर्घ संशोधनाधारें– हरिमेखळा म्हणजे अन्यथाज्ञान, वंचना, मायाविद्या, इंद्रजाल, दृष्टिबंधन, हातचलाखी, जादूगिरी** सर्व **सिद्ध** होतात.

(२३) कानडी वाङ्मयांत इ. स. १२४३ च्या पूर्वी देखील हा शब्द कानडी कवींद्रानीं उपयोगांत आणलेला आहे.

हा शब्द कानडी प्रचारातील आहे हें स्पष्ट आहे.

**शोध २ रा— ज्ञानेश्वरी. (अ. १३-३१९)**

**रत्नपारखियांचा गांवीं ।**
**जाईल गंडकी तरी सोडावी ।**
**काश्मीरीं न करावी । मिडगणें जेंवि ।**

(२४) मिडगणें=तळतळणें, धाधावणें पहा— अन्नासाठीं मिडगलीं । झडा टाकिती ॥ दासबोध ॥ हा शब्द कानडी प्रचारांतील आहे. पहा– मिडुगु, क्रियापद : अर्थ– तळतळणें, कष्टी होणें. काश्मीर= स्फटिक.

(२५) संदर्भ— अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, क्षांति, आर्जव– यांपैकीं पहिल्या दोहोंवर प्रवचन संपवून अहिंसेचा क्रम येतांच अहिंसेच्या सडेतोड रूपाविष्कारांत यज्ञीय हिंसेला देखील ज्ञानेश्वरांनीं पंक्तिबाह्य ठरविली.

(२६) यावर याज्ञिक म्हणतो– मनु ५।३९
**यज्ञाश्च भूत्यै सर्वस्व तस्मात् यज्ञे वधोऽवधः ।**
म्हणजे यज्ञानें अखिल जगताचा अभ्युदय होतो म्हणून यज्ञीय हिंसा ही अहिंसा आहे.



अनुक्रमणिका







( २७ ) ज्ञानेश्वर म्हणतात— तिला आम्ही अभ्युदयकारिणी हिंसा म्हणूं. पण तिला अहिंसेची पदवी किंवा आदर मिळणार नाहीं. माझ्यासमोर बसलेले हे श्रोते रत्नपारखी आहेत. याठिकाणी चोख अहिंसा–रत्नच; कसोटीला उतरणार. बनावट अहिंसा रत्न– येथून लोटून दिलें जाईल. रत्नपारखियांच्या बाजारांत चोख रत्नालाच प्रवेश मिळेल. कानाडोळा करून भागणार नाहीं. नामधारी रत्नाला येथें स्थान नाहीं. नाहींतर रत्नपारखियांच्या गांवांत येऊन — ( पद्म पुराण )

**शालग्रामशिलास्पर्शात् कोटिजन्माघनाशनम् ।**
**किं पुनः पूजनं तत्र हरेः सांनिध्यकारणम् ।।**

म्हणजे — माझ्या स्पर्शानें कोटिजन्माचें पाप नष्ट होतें व माझ्या पूजनानें विष्णुसांनिध्य लाभतें. शिवाय रत्नाप्रमाणेंच मीहि अश्मजातींतलाच एक आहे म्हणून मला रत्न म्हणा असें—जर यज्ञीय हिंसेप्रमाणें — शाळिग्राम आपला हक्क प्रतिपादूं लागेल तर —

**पाषाणं यद्भवं तत्तु शालग्राम इति स्थितम् ।**

बा शाळिग्रामा, गंडकी ( यद्भवं ) नदीतला तूं एक पाषाण आहेस. तुला रत्नाची सर येणार नाहीं. पापविमोचन व हरिसांनिध्य या दोन अभ्युदयकारक–गुणांमुळें तुला देव्हाऱ्यांत उचित स्थान लाभलें आहे.

( २८ ) तरी देखील मला रत्न म्हणा — असा हट्ट धरशील तर —

एकच शाळिग्राम नव्हे तर शाळिग्रामाचा संभार घेऊन, रत्नपारखियांच्या गांवी प्रत्यक्ष गंडकी नदी जरी आली तरी तिला परतविलें जाईल.

( २९ ) ज्ञानेश्वरोक्त दुसरें उदाहरण — स्फटिक स्वच्छ असतें. त्यांतून आरपार दिसतें. स्फटिकाच्या ईश्वर–प्रतिमा देखील बनवितात. त्या प्रतिमांना जनता वंदन करिते. म्हणून स्फटिक जर — आम्हींहि वंदनीय आहो. ईश्वर–प्रतिमा–जनित पात्रतेमुळें आम्हींहि रत्नांप्रमाणेंच अश्मजातींत श्रेष्ठ आहों. आमची "स्फटिकमणि" अशी संज्ञा रूढच आहे. तेव्हां — आम्हांला रत्नें म्हणा नां ! !

( ३० ) अशी ( मिडगणें ) धावाधाव, तळमळ करितील तर — बा स्फटिकानों, तुम्हांला स्फटिकमणि ही संज्ञा आहेच. तीच उचित आहे. खऱ्या रत्नांच्या जोडीला तुम्हांला बसतां येणार नाहीं. उगीच नसती तळमळ किंवा हांव धरूं नका. आम्हांला रत्नांत संकर करावयाचा नाहीं. रत्नें तीं रत्नें, व पाषाण ते पाषाण हें लक्षांत ठेवा असें ते रत्नपारखी ठांसून सांगतील.

( ३१ ) ओवीचा अर्थ — रत्नपारखियांच्या गांवी ( एकच शालीग्राम नव्हे तर सर्व शालग्रामांचा संभार घेऊन प्रत्यक्ष ) गंडकी ( नदी जरी ) जाईल तरी ( ती ) सोडावी ( लोटून द्यावी ) जेंवि ( तसेंच ) काश्मीरीं ( स्फटिकांनीं हि ) मिडगणें ( हांव ) न करावी. ( त्यांचा विचार रत्नपारख्यांच्या बाजारांत व्हावयाचा नाहीं ).

( ३२ ) तर मग यांचा विचार कोठें होईल ? याला उत्तर खालील ओवींत दिलें आहे — तें असें —

**इच्छा वासकापुरा । मंद जेथें अवधारा ।**
**पिठाचा विकरा । तियें सांतें । ज्ञा० १३।३२०।।**

शब्द— वासकापूर = पचकापूर; विशिष्ट सुवासाचा कापूर.

सांते — सांत म्हणजे बाजार । पहा — पेठें फुलसांतेचां । नरेंद्र० ४७७ । फुलबाजाराच्या पेठेंत.

संदर्भ — बनावट रत्नें किंवा माल खपण्याची जागा म्हणजे चोख रत्नपारखियांचा बाजार नव्हें. तो बाजार वेगळा आहे. ज्या बाजारांत खऱ्या सुगंधी वासकापुराची चाडच बेताची आहे. त्या स्थानीं बनावट माल खपेल.

( ३३ ) ओवीचा अर्थ — अवधारा ( हें पहा, ) वासकापुराची इच्छा ( चाडच ) जेथें मंद ( अतीक्ष्ण ) तियें सांते ( त्या बाजारांत कापूर म्हणून ) पिठाचा













अनुक्रमणिका

विकरा ( पांढऱ्या पिठाच्या वड्या खपणें संभवनीय आहे ).

या ३१९।३२० दोन ओव्यांतील उदाहरणाने यागीय हिंसा ही हिंसाच होय हा आपला सिद्धांत ज्ञानेश्वरांनीं समर्थिला आहे.

**शोध ३ रा, एक महत्त्वाचा अवश्य पाठभेद वांनवसे– या ऐवजीं– भानवसे असें पाहिजे**

( ३४ ) मूळ शब्द संस्कृत महानस, त्याचा अपभ्रंश म्हाणस. मग ( म्हणितलें, भणितलें या आधारें ) भानस व मग भानवस व नंतर भानिवस भाणवस असे विकल्प आले.

( ३५ ) उदाहरणें– ( १ ) महात्मां भानवसीं चुली न घलाविया । स्मृ. ४१ पृ. १३.

तुंवा गोकुळीचां भानवसी : गजामांसाचें वरण रोधिलें । भास्करभट्ट.

**यावरून महानस=भानवस=स्वयंपाकघर हा अर्थ आहे–**

– हें ज्ञानेश्वर कालीन महानुभावी ग्रंथावरून सहज समजतें.

( ३६ ) गुरुचरित्र अ० ७–१ ८–जें जें मागेल भाणवसी । सर्व आणूनि त्वां द्यावें । – यावरून– भाणवसी म्हणजे स्वयंपाकी हा अर्थ स्पष्ट आहे. भानवसी असा शब्द रूढ आहे.

( ३७ ) कानडी मध्येंहि महानस, तद्भव बाणस– किटेल कोशांत दिला आहे हा कानडितील बाणस– व वर ले. १ मधील भानस हे शब्द समान आहेत. कानडीत बाण सिग म्हणजे स्वयंपाकी, हा शब्द रूढ आहे.

( ३८ ) ज्ञानेश्वरीत ३–४ ठिकाणी, तत्कालीं रूढ, भानवसे या शब्दाऐवजी वानवसे वानिवसे– असा शब्द आला आहे तो लेखक प्रमाद आहे, हें निःसंशय आहे. **वानवसे किंवा वानिवसे या ऐवजी भानवसे किंवा भानिवसे हा सर्वत्र घातलाच पाहिजे.**

( ३९ ) वानवसे हाच प्रामादिक शब्द खरा मानून टीपाकारांनीं काल्पनिक अर्थ दिले आहेत ते असे—

वानवसे= ( १ ) यदृच्छेंकरून ( २ ) अकस्मात् ( ३ ) चुकूनसुद्धां ( ४ ) एकाएकीं ( भावेकोश पृ. ३९०, मिडे ग्रंकट ) हे सर्व अर्थ बनावट आहेत. कारण त्यांना आधार नाहीं.

ज्ञानेश्वरींत हा शब्द तीनदां आला आहे

व त्या तीन्हीं ठिकाणीं स्वयंपाकघर ( भानवसे ) हाच अर्थ उद्दिष्ट आहे हें खालीं दाखवितों. पहा–

( ४० ) पहिला निर्देश–अध्याय १–२५७ मध्ये –जालगिरी प्रत

**जैसा घरीं आपुला । वानिवसे वन्हि लागला ।**
**तो आणिकांहि प्रज्वळला । जाळौनि घली ॥**

अर्थ— जसें आपल्या घरीं स्वयंपाक घराला ( भानवसे ) लागलेली आग भडकली असतां ती दुसऱ्या ( माजघर, सोपा, ओटी ) विभागांना जाळून भस्म करिते. —असा प्रांजळ अर्थ लागतो.

**लक्षांत घ्या**—या ओवींत, वानवसें = अकस्मात् वगैरे सर्वहि अर्थ त्याज्य आहेत. कारण वानवसें हा मूळ शब्द या ठिकाणीं अप्रस्तुत आहे. अर्थात् त्याचा टीकाकारांनीं केलाला अर्थहि केवल काल्पनिक कृत्रिम आहे म्हणून–

**भानवसे–असाच शुद्ध पाठ पाहिजे.**

( ४१ ) आतां दुसरा निर्देश–राजवाडेप्रत अ० १६३६.

पैं निर्धना घरीं वानवसें । महालक्ष्मी येउनि बैसे ।
तेयाहि वरतें निर्धन ऐसें । म्हणों ये काई ॥

अहो, निर्धनाच्या घरीं, अगदीं स्वयंपाकघरांत महालक्ष्मीनें ठाणें दिलें तरीहि त्याला निर्धन म्हणतां येईल काय ?

**लक्षांत घ्या**– या ठिकाणींही स्वयंपाकघर हाच अर्थ सुसंगत आहे. शके १६७१ च्या पर्याय-शब्द-कोशांत दिलेला मध्यगृह हा अर्थहीं सुसंगतच आहे म्हणून —



अनुक्रमणिका






**मूळ शब्द भानवसे असाच पाहिजे.**

( ४२ ) **आता तिसरा निर्देश**–राजवाडे अ० १८–१४८४.

म्हणौनि योग्य भले तैसें । होंतु परी चाड नसे ।
तरी झनें वानवसे । देशी हें तया ॥

अन्वय– म्हणौनि भले तैसें होंतु योग्य, परी वानवसे चाड नसे तरी तेया हें झनें देसी ॥

संदर्भ—वर ले० ४ मध्यें भानवसी = स्वयंपाकी असा साधार अर्थ सिद्ध केला आहे. स्वयंपाकी = अन्ननिर्माता, हें उघड आहे. गीतारूपीं दिव्यान्न-निर्माता आपण स्वतः आहो– याला अनुलक्षून भगवान् श्रीकृष्ण म्हणतात–

तऱ्हीं गीताशास्त्र--निर्माता ।
जो मी सकललोकु–शास्ता ।
तेयां मातें सामान्यता । बोलैल जो ॥ ८८ ॥

म्हणजे — तरी पण गीताशास्त्ररूपीं दिव्यान्न निर्माण करणारा जो मी ( भानवसी ) त्या मलाहि जो यःकश्चित् म्हणून लेखील तोहि कितीहि योग्य असो–तरी या गीताशास्त्र–प्रसादाला तो पात्र नाहीं.

या संदर्भावरून वरील १४८४ या ओवीचा अर्थ —

म्हणून इतर बाबतींत वाटेल तितका योग्य असो परंतु जो भानवसे ( स्वयंपाककर्त्याविषयीं देखील ) तुच्छता दर्शवील त्यालाहि हें दिव्यान्न देऊं नको, असा बिनचूक अर्थ आहे.

( ४३ ) यावर शंका– वानवसे चाड नसे– यांत दूरान्वय होतो.

याला उत्तर– दूरान्वय होत नाहीं. ज्ञानेश्वरांचे असले प्रयोग विपुल आहेत एकच उदाहरण देतो.–

देखा काव्यनाटका । जीं निर्धारितां सकौतुका ।

यांत– सकौतुका काव्य नाटका देखा– असा अन्वय प्रसक्त आहे व तो एकच आहे, दुसरा होतच नाहीं.

याच प्रमाणें वरील १४८४ या ओवीचा अर्थ वर दिला आहे.

सारांश– स्वयंपाकघर किंवा स्वयंपाकी हेच अर्थ सुसंगत आहेत.

म्हणून— **भानवसे—हाच पाठ ग्राह्य ठरतो. वानवसे व त्याचे टीपाकारांनीं दिलेले अर्थ अग्राह्य ठरतात.**

**आतां 'वानवसे' याचा विचार.**

( ४४ ) ज्ञानप्रबोध या महानुभावी ग्रंथात ( पृ. ६६ ओवी ७६ ) वानवसें हा शब्द आला आहे तो असा—

आंगीचेनि गोरेपणें । जिंतलें **वानवसें** चांदिणें ॥
सौरभ्यें पारुल म्हणे । कनकचांपयातें ॥ ७६ ॥

अर्थ–आंगच्या गोरेपणामुळें, वर्णबलानें ( वानवसें = वर्णवशें ) चांदणें जिंकलें; सौरभ्यातें सोनचांपयाला निर्गन्ध ठरविलें. अर्थात् वानवसें = वर्णवशें = वर्णबलें, हा अर्थ स्पष्ट आहे.

दोन शब्द व दोन स्वतंत्र अर्थ–

वरील प्रदीर्घ प्रतिपादनावरून–**भानवस=स्वयंपाकघर व वानवसें = वर्णबलानें**, असे त्या दोन शब्दांचे दोन स्वतंत्र अर्थ सिद्ध झाले.

याला पोथीचा आधार

( ४५ ) **बिकानेर अनूपलायब्ररींतील** एका पोथींत– ( १–२५७ )

**( ता ) ( भा ) – निवसें वन्हि लागला ।**

असा तो चरण दिला आहे. पैकीं ( ता ) हा निरर्थक आहे. ( भा ) पाठ आमच्या वरील विवरणाला पूर्ण पोषक आहे, इतकेंच नव्हें तर–भानवस हाच पाठ अधिकृत ठरतो.

( ४६ ) दामोदरकृत वच्छहरण, ओवी ४२१–

**कर्माचीए वरगणे पडिले ।**

यांत वरगण = वाटणी व वरगणे = वाटणींत, हें उघड आहे. त्याचप्रमाणें भानवसें = स्वयंपाकघरांत, हा अर्थ होतो.



अनुक्रमणिका

( ४७ ) संशोधकानीं बदल करणें अवश्य आहे —वानिवसें हा पाठ काढून—टाकून भानवसे-हा पाठ स्वीकारणें अवश्य आहे. तो स्वीकारला म्हणजे शुद्ध पाठ होईल तो असा—

शुद्ध पाठ —

( १ ) भानवसे वन्हि लागला ।
राज० १–२५७.

( २ ) पै निर्धनां घरीं भानवसे ।
राज० १६–३६.

( ३ ) तरीं झनें भानवसे ।
राज० १९–१४९४.

वानवसे–हा पाठ टाकिला पाहिजे.

**शोध ४ था, उसिनां घांई ( अ० २–१९० )**

( ४८ ) तंजावर प्रतींत–उसिणे घाई झुंझावें —असा पाठ आहे–उसिना घाई–याच्या अर्थासंबंधीं अनेकांनीं अनेक तर्क केले आहेत, पण सारे व्यर्थ आहेत.

उसिना घाई म्हणजे-उसन्या प्रहारांनीं-एवढाच अर्थ आहे. विवरण–अरे शत्रो-लवकर फेड, अथवा उशीरानें फेड, किंवा फेडले नाहींस तरी चालेल; परंतु आज या घटकेस खूपसे ठोसे उसने घेऊन ठेव-असें ओरडून सतत दिले जाणारे ठोसे किंवा प्रहार, असा अर्थ आहे, हें मुक्तेश्वर, सभापर्व, पृ. ७८ ओवी, ३१ —

**करप्रहार लत्ताप्रहार । मुष्टिप्रहार मस्तकप्रहार ।**
**मोजोनि मारिती शतसहस्र । " उसणे घे घे म्हणोनि " ॥**

यांतील–उसने घे घे म्हणूनि मारती–या निर्देशा-वरून स्पष्ट होतें. दुसरा उतारा पहा–

मज तुज हो कां झुंझ । उसीना घाई देणें घेणें ।

असा-चोंभा उषाहरण पृ. १६ ओवी ९ - निर्देश आहे.

**शोध ५ वा, हा उघड लिंगभेदु ( अ.२–३१ )**

( ४९ ) लिंगभेदु म्हणजे ईश्वरप्रतिमाभंग असा अर्थ नाथानीं दिला आहे. पहा– (ए. भा. पृ. ८१)–

अतिभीत जरा व्याघ्र ।
म्हणे मी पापात्मा अति अशुद्ध ।
नेणतां घडला हा अपराध ।
लिंगभेदु मज घडला ॥ ३४ ॥

ईश्वरप्रतिमा उच्छेदी । तो महापापी लिंगभेदी !

तसेंच

प्रासादभेद, लिंगभेद पाही ।
पंक्तिभेद हरिहरभेद । शिव. ली. १–१३२

अशीं हीं महापापें वर्णिलीं आहेत. यांत प्रासाद-भेद म्हणजे देवालय मोडणें, लिंगभेद म्हणजे ईश्वर-प्रतिमा-भंग, पंक्तिभेद म्हणजे एकाच पंक्तीत भोजनास बसलेल्यांना ( स्वकीयांना साजूक तूप व इतरास भेसळीचें तूप वाढणें यासारखा ) भेद-भावानें विषमान्न वाढणें व हरिहर भेद म्हणजे–

शिव थोर विष्णु लहान ।
हरि विशेष हर गौण ।
ऐसे म्हणती जे त्यां लागून ।
आणोनी नरकीं घालावे ॥
( शिवली. ११–११६ ).

**शोध ६ वा–** अध्याय १३ ओवी १६६–

ऐसीं जियें ज्ञानीं ।
मुनीश्वरां उतान्हि ।
वेदतरूच्या पानोवानीं ।
हिंडताती ॥

( ५० ) विवरण–उतान्हि याचा अर्थ–इच्छा–असा अनेकांनीं दिला आहे. पण त्याला आधार कोणीहि दिलेला नाहीं. यावरून तो काल्प-निकच ठरतो. शिवाय 'इच्छा' हा अर्थहि प्रस्तु-तांत अगदीं दुर्बलच वाटतो. अर्थात् तो त्याज्य आहे.

आमच्या मतें अर्थ.

उत्+स्तनी बालकें, म्हणजे–स्तन सोडविलेली बालकें–असा अर्थ होतो. हीं बालकें मातेला पहा-तांच दुर्दम्य चळवळ करून स्तनपान करण्याचा










आटोकाट हांवरेपणा प्रकट करतात. यावरून–उतान्हि म्हणजे – अनिवार्य हांवरेपणा – या अर्थाची छटा मुनीश्वरांना शोभणारीच आहे. कोरड्या इच्छेने मुनीश्वर स्वस्थ बसणारे नसतात.

(५१) एका शके १६७१ च्या जुन्या पर्याय कोशांतहि–

उतान्हि = स्तन सोडलेलीं बाळें,

–असा अर्थ दिलेला आहे. त्या ठिकाणीं – स्तन सोडवलेलीं– एवढा शोध केला म्हणजे अर्थ बरोबर होतो. सारांश –

उतान्हि = अनिवार्य हांवरेपणा

असा अर्थ सिद्ध होतो. बाकीचे अर्थ त्याज्य होत.

शोध ७ वा – अ. ९ ओ. २०५

मेघु उदारु परि ओसरे।
म्हणौनि उपमेसी नुपकरे।
ते निःशंकपणें सपांखरे।
पंचानन ॥

(५२) विवरण– 'पाखरणें' व नाम 'पांखर' यांच्या अर्थाची व्युत्पन्न व साधार चर्चा व अंतिम सिद्धि, नवभारत, नोव्हेंबर १९५८ पृ. ४६, ४७, ४८ वर सविस्तर दिली आहे ती वाचकांनीं पहावी.

"सैन्यरूपी सिंह चिलखतांनीं युक्त केला"– असें म्हणणें योग्य वाटत नाहीं – असें श्री. केळकर म्हणतात. पण ज्ञानेश्वरांनीं स्वतःच–

सपांखरें पंचानन
म्हणजे
पांखरांनीं सुसज्ज सिंह
म्हणजे
कवचानीं युक्त सिंह

असा प्रयोग केला आहे. यावर श्री. केळकरांचें काय उत्तर आहे? पाखर म्हणजे कवच, चिलखत, हा अर्थ संमत केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. अर्थात् "पाखरणें" या नामधातूचा त्यांनीं केलेला बेडौल अर्थ व निराधार शंका व्यर्थ होत.

(५३) अर्थ– नैसर्गिक सामर्थ्याच्या कवचानें सदा सुसज्ज असे सिंह असतात. तसेंच प्रस्तुतांतील महात्मेदेखील सदा पूर्णतेच्या कवचानें सुसज्जच असतात. पहिले सिंह तर हे महात्मे "पुरुषसिंह" होत. त्या सिंहाप्रमाणेंच हे पुरुषसिंह देखील 'निःशंक, निर्भय," असतात.

याप्रमाणें आम्हीं प्रतिपादिलेला पाखर, व पाखरणें— या दोन शब्दांचे अर्थ ज्ञानेश्वरांनींच सुदृढ केले आहेत. असो.

(५४) शोध ८ वा—
अ. १३ ओवी ११६७––

प्रभु काश्मीरीं मुंके।
नुपजे जी कवतिकें।

यांतील, काश्मीर म्हणजे केशर व काश्मीरीं याचा केशरांत– असा योग्य शब्दार्थ आधाराला घेऊन– त्याची चर्चा नवभारत डिसेंबर १९५९ पृ. २९ वर केली. दुसरा बलवत्तर आधार मिळेपर्यंत तसा अर्थ करण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता.

परंतु आतां एक बिनतोड आधार मिळाला आहे. त्या आधारें खालीं अर्थ केला आहे.

(५५) श्री. वंकट स्वामींनीं– **सरस्वतीचा** पुत्र– असा अर्थ दिला आहे; हें खरें. परंतु आधाराशिवाय– कोणताहि अर्थ कायमचा ग्राह्य होऊं शकत नाहीं. शिवाय वरील अर्थहि शब्दशः बरोबर नाहीं, गोळाबेरीज आहे.

(५६) रघुवंश सर्ग ४ श्लोक ६७ यांतील -कुंकुम-केसराणां- या शब्दावरील व्याख्यानांत, **दक्षिणावर्तनाथ व नारायण** या टीकाकारानीं -काश्मीरकवि बिल्हणकृत विक्रमांकदेवचरितांतील सर्ग १ ला श्लोक २३ वा उध्दृत केला आहे तो असा—

सहोदराः कुंकुमकेसराणाम्।
भवन्ति नूनं कविताविलासाः।
न शारदादेशमपास्य येषाम्।
दृष्टो यदन्यत्र मया प्ररोहः॥



अनुक्रमणिका






यांत या काश्मीरी - कवीनें—

काश्मीर = शारदा देश = सरस्वतीचा देश असा अर्थ दिला आहे. यावरून—

" सरस्वतीच्या देशांत कौतुक म्हणून देखील मुकें मूल निपजत नाहीं. -- असा हा ज्ञानदेवाचा अभिप्राय साधार सिद्ध होतो.

**तात्पर्य** --- **काश्मीर** म्हणजे **सरस्वतीचा देश** -- हा अर्थ सिद्ध झाला.

**शोध ९ वा**– अ. १८ ओवी २८० —

जों सर्व कर्म सिद्धीलागीं ।
इयेंचि मुद्दलें हो जगीं ।
तेथ न सुवावा **अभंगीं** ।
आत्मराजु ॥

( ५७ ) **विवरण**– या ओवीतील ' अभंगीं ' ह्याचा अर्थ ' अयोग्यरीतीनें ' असा सर्व टीपकारांनीं दिला आहे, पण तो चूक आहे. चूक कसा ?

उत्तर– भक्तिविजय अ. ४ ओवी २५८ मध्यें–

त्यांचीं चरित्रें युक्तिप्रयुक्ति ।
वर्तलीं तैसींचि बोलिजेति ।
अभंगीं नाम महिपति ।
नवल संतीं हें केलें ॥

महिपति म्हणतो– भक्तचरित्रें वर्णिलीं. एवढी प्रचंड कामगिरी महिपतीनें केली म्हणून संतांनीं ' नवल ' म्हणजे ' कौतुक ' केलें. म्हणजे या ओवींत अभंगीं = अयोग्यरीतीनें हा अर्थ मुळींच जमत नाहीं. कारण तो उलट– कौतुकास्पद झाला आहे. अर्थात् वरील अर्थ चुकीचा आहे, हें स्पष्ट आहे. तर मग खरा अर्थ कोणता ?

( ५८ ) शके १६७१ च्या पर्यायकोशांत –

अभंग = कवीचें नांव,

असा चांचपडत अर्थ दिला आहे. आतां – " अभंगीं नाम महिपति " व " अभंग " म्हणजे कवीचें नांव, या दोन गमकांवरून —

अभंग = कवीच्या नांवाची जागा
अभंगीं = कवीच्या नांवाच्या जागेंत

असा अर्थ स्पष्ट दिसतो.

उदाहरण

( १ ) (        ) म्हणे गर्भवासीं, – येथें कंसातील जागेला – अभंग – ही संज्ञा आहे.

( २ ) (तुका) म्हणे गर्भवासीं– येथें अभंगीं– म्हणजे कंसांत " तुका " हें नांव आहे. –म्हणजे अभंगीं " तुका " घातला आहे.

याचा अर्थ

या काव्याचें कर्तृत्व श्रीतुकारामाला दिलें आहे.

सारांश–

अभंगीं घालणें = कर्तृत्व अंगीं चिकटविणें हा अर्थ सुबोध झाला.

– प्रस्तुत ओवीचा अर्थ –

( ५९ ) वरील अर्थाधारें प्रस्तुत ओवीचा अर्थ असा होतो – जगामध्यें सर्व कर्मांचीं सिद्धि करणारीं हीं पांच कारणें कारणीभूत आहेत. या कर्मांच्या अभंगीं म्हणजे कर्त्याच्या जागीं आत्मराजाचें नांव घालूं नये, म्हणजे– या कर्मांचें कर्तृत्व आत्मराजाकडे देऊं नये. आत्मराजाच्या अंगीं चिकटऊं नये. असा स्पष्ट, व्युत्पन्न, सुबोध, संदर्भोचित अर्थ सिद्ध होतो. अर्थात् इतर अर्थ त्याज्य होत.

( ६० ) **शोध १० वा**, अ० १२ ओवी ४१ चा अन्वयार्थ –

परी ध्यानाही कुवाडें ।
म्हणौनि एके ठायीं न संपडे ।

याचा **अन्वय**–परी कुवाडें म्हणौनि, ध्यानाही एके-ठायीं न संपडे ।

–बंकटांचा अर्थ– चुकीचा.

परंतु तें ब्रह्म एके ठिकाणीं न सांपडल्यामुळें ध्यानालाहि कठीण आहे. परंतु हा अर्थ चूक आहे.

उचित अर्थ.

( ६१ ) परंतु तें ब्रह्म कूटस्थ असल्यानें ध्यानालाहि एके ठिकाणीं सांपडत नाहीं.



अनुक्रमणिका








सर्व टीपाकारांचा अर्थ चुकीच्या अन्वयावर आधारला आहे.

( ६२ ) शोध ११ वा– अढंचु ।

ऐसें अढंचें आंतुचि रिचे ।
बाहिरिल माघौति न वचे ।
म्हणौनि राहणें आधि ए दिठीचें ।
तेथेंचि होय ॥ –(अ० ६, २०५)
ऐसें नाममात्रें जेणें ।
धात्रेया अढंचु करणें ॥ –(अ०१७–३३८).
जें असौनि त्रिशंकुदोसें ।
धात्रेयाही आणावें वोसें ॥ (अ०१८,१७६६).

**संदर्भ** – अर्धोन्मीलन स्थितीच्या द्वारें दृष्टीचा नासाग्रपात आपोआप घडतो– हें प्रस्तुत.

( ६३ ) ज्ञानेश्वरांनीं हा अढंच शब्द– दोनदां वापरला आहे. सहाव्या अध्यायांत ( १ ) विशेषण व अठराव्या अध्यायांत– ( २ ) अढंचु करणें– असें क्रियापद उपयोजिलें आहे.

( ६४ ) टीपकारांनीं दिलेला अर्थ केवळ तर्कप्रतिष्ठ आहे. तो कसातरी जुळविला आहे तो चुकीचा आहे. हा शब्द कानडीप्रचारांतील —

अडंचु— क्रियापद = ठासून भरणें,
= भरणें, दाबणें–कोंबणें

या शब्दावरून मराठींत शिरला आहे. ( पहा– किटेल, कानडी कोश, पृ. ३१, डावा कॉलम ). हाच अर्थ येथील दोन्हीं प्रस्तुतांत जुळतो हें खालीं दाखविलें आहे—

ओवीप्रयुक्त शब्दांनींच विवरण करीत आहे.

( ६५ ) थोरीव आलेले दोन्हीं भुजदंड उभारले म्हणजे मधील शिरकमल गाढें होतें. ही गाढता, ललाट, भुवया यांच्या बरोबरच पापण्यांतहि– "भरतांना" त्या दोन्ही पापण्या मिटू पहातात, गाढता पूर्ण भरली म्हणजे मग त्या पापण्या जागच्या ढळत नाहींत. वरच्या गाढ अन्तर्मुख पापणीनें अर्धा डोळा झांकल्या सारखा होतो. खालची गाढ पापणी जागच्या जागींच बहिर्मुखत्वानें फुलते, व त्या योगें अर्धा डोळा उघडा राहतो. अशा प्रकारें नेत्रांची आपोआप अर्धोन्मीलन स्थिति लाभते. या अर्धोन्मीलित नेत्रांतील दृष्टि– आंतून सहज बाहेर पाऊल घालील तर ती नेमकी नासाग्रपीठावरच पडते.

२०५ वी ओवी

( ६६ ) याप्रमाणें गाढतेनें भरलेलीं ( अढेचें– बहुवचन ) दोन्हीं पातीं ( पापण्या ) स्वस्थानबद्धच राहून परत बाहेर येत नाहींत. त्या कारणानें अर्धोन्मीलित दृष्टीचें वास्तव्य देखील तेथेंच कायम असतें. यावरून –

अढंच = भरलेले, धारलेले हा अर्थ येथें जुळतो. प्रस्तुत स्थलीं–अढंच म्हणजे ( गाढतेनें ) भरलेल्या पापण्या– हा उचित अर्थ वर मांडिला आहे.

( ६७ ) आतां दुसरी ओवी– ( अ० १७ ). सतराव्या अध्यायांत –

अढंचु करणें = ठासून भरणें,

हाच अर्थ होतो हें खालीं दाखविलें आहे. अ० १८ तील १७६६ व्या ओवींत –

धात्रेयाही आणावें वोसें ।

यांतील– वोसें आणणें, म्हणजे– ओस पाडणें, रिकामें करणें– हा अर्थ स्पष्ट आहे.

" रिकामें करणें " या अर्थाच्या बलानें– अ० १७ ओवी ३३८ तील–

ऐसें नाममात्रें जेणें ।
धात्रेया अढंचु करणें ।

यांतील– अढंचु करणें, म्हणजे, " कोंबणें, " " तुडुंब भरणें "– भरणें– हा अर्थ दृढ होतो, " वोसें आणणें " याच्या उलट– " तुडुंब भरणें " हाच अर्थ आपोआपच सिद्ध होतो.

किटेल कोशांत –

अडंचु ( अडचु ) = To pack, ठासणें
= To stuff, कोंबणें
= To press down, दाबणें



अनुक्रमणिका






—वगैरे अर्थ दिलेले आहेत.

अडंचु ( कानडी प्रचारांतील, ) व

अढंचु ( ज्ञानेश्वर प्रयुक्त )

हे दोन्ही शब्द सारखेच आहेत.

उदाहरण

दासविश्रामधाम, भाग ७ वा, पृष्ठ. ३३३ वर

अढंचे अचाटें ऋषीदेव थाटें ।
बहूसाल दाटे रूपें लखलखाटे ॥

येथेंहि—" अढंचे ऋषीदेव "— " कोंबलेले ऋषीदेव " अतिशय दाटले—अतिशय दाटी झाली, खेटून बसले.

शोध १२ वा—

( ६८ ) अ० २ ओवी ४६ ( राज० )

हे येणें मानें दुर्भर ।
जें यया ही होनि भोग सपूर ।
ते असतु एथ भिक्षा वर ।
मागतां भली ॥

श्री. आगाशे यांनीं ( पृ. ६१ वर ) इतर टीपकारांचे अर्थ चूक ठरवून आपला अर्थ पुढें केला आहे.

परंतु

त्यांचा अर्थहि समूळ चूक आहे—हें खालील विवरणावरून स्पष्ट होईल. क्रमानें ओवींतील शब्द—

हे—ओवी २८ पासून ४५ अखेरपर्यंत ज्यांचें वर्णन केलें ते द्रोणभीष्मादिक.

येणें मानें-- या उच्च कोटीच्या प्रमाणानें

दुर्भर-- ( वधानंतर त्यांची जागा भरून न निघण्या- इतके ) दुर्भर ( आहेत हें सिद्ध असतांही )

—याचे विरुद्ध—

यया ही होनि-- ( याचें विरुद्ध ) या द्रोणभीष्मा- दिकांपेक्षांही

सपुर जे भोग-- अधिक स्वीकारयोग्य ( स्पृहणीय ) असे वाटणारे जे राज्यादिक भोग.

ते असतु-- ते असेनात कां ! ! ( ते, उलट प्रति- पादन करणाऱ्यानांच लखलाभ होवोत. मला तर—राज्यभोगादिकांपेक्षां द्रोणभीष्म अधिक सन्माननीय--स्पृहणीय वाटतात. त्यांच्या वधानें प्राप्त होणारे राज्यादिक भोग मला अत्यंत तुच्छ वाटतात. स्पृहणीयतर वाटणाऱ्यांना तसे वाटो विचारे ! मला नाहीं वाटत. )

एथ— अशा प्रस्तुत प्रसंगीं,

भली भिक्षा मागतां वर } — स्वच्छ (सुरेख) भिक्षा मागणें वर ( वरं अधिक चांगलें ).

— असें माझें मत आहे.
( असें अर्जुन स्पष्टीकरण करीत आहे. ).

' वर ' याचा अर्थ संस्कृत ' वरं ' म्हणजे उचिततर या अर्थानेंच ज्ञानेश्वरानीं सर्वत्र वापरला आहे.

बंकट— दांडेकरांचे पाठभेद करमणूक करणारे आहेत. त्या आधारें त्यांनीं केलेले अर्थ अधिकच रंजक आहेत.

टीप— महाराष्ट्र राज्यसरकारतर्फे मुद्रित झालेली राजवाडे—प्रतीची द्वितीयावृत्ति अत्यंत " उतान्हेनें " म्हणजे हांवरेपणाने पाहिली. त्या मुद्रणाविषयीं—

१. अकरणात् मंदकरणं श्रेयः ।

या सन्मान्य सिद्धान्ताला डावलून—

२. ( मंदकरणात् अकरणं श्रेयः ।

या नवीन सिद्धान्ताचा आश्रय घेऊन त्या **नियुक्त पंचसंख्याक मंडळाने** अत्यंत कसोशीनें ही आवृत्ति संपादिली आहे—एवढें म्हटलें म्हणजे संपलें. राजवाड्यांच्या निष्काळजीपणानें छापलेल्या दुर्लभ प्रतीची जशीच्या तशी आवृत्ति, या तज्ञपंच- कानें गिऱ्हाइकांना सुलभ करून दिली—हाहि मोठाच लाभ होय. पण त्या नवीन आवृत्तींत—राजवाड्यांची





अनुक्रमणिका

विद्वत्ताप्रचुर अनेक पृष्ठी प्रस्तावना अन्तर्भूत केली नाहीं–ही अक्षम्य उणीव उठून दिसते.

नवीन कांहींच घालतां आलें नाहीं तर जुनें आहे तसेंच छापावयाचें, त्यांत गाळागाळी कां !

माझी संशोधनें सारीं नवभारत मासिकें ।
छापुनी जनसेवेतें केले, मोद मनीं पिके ॥
त्या साऱ्या मंडळीनां मी "चिरायु व्हा तुम्हीं तसे ।
नवभारतहि–" ऐसा आशीर्वाद करीतसे ॥

**सूचना**

(१) शुद्ध पाठाची ज्ञानदेवी हातीं येईपर्यंत ज्ञानेश्वरीचें व्याकरण कसें लिहितां येईल.

(२) निदान शेवटीं नाथांच्या ओव्या नसलेल्या, व– शके बाराशतें बारोत्तरें– ही ओवी राजवाडे प्रतींतील प्रमाणें, किंवा तंजावर– प्रतींतील प्रमाणें भिन्नस्थानीं असलेल्या ४।५ हस्तलिखितांवरून शुद्धपाठाची प्रत तयार केल्याशिवाय– ज्ञानेश्वरीचें व्याकरण कसें लिहितां येईल.

(३) सांप्रत राजवाडे प्रतींतील आहेत त्याच पाठप्रयोगादिकांवरून कोणी व्याकरण लिहूं जाईल तर तें एक वेडें धाडस होईल. कारण लेखककृत प्रामादिक पदच्छेद– पदसंयोग– वाक्प्रयोग– यांची रेलचेल आहे. तत्सम प्रतींच्या साहाय्यानें अर्थ करितां येतो. परंतु व्याकरण लिहितां येणार नाहीं.

(४) तसेंच अपभ्रंश-शब्दहि अनेक आहेत कांहीं नियमांत बसतात, तर कांहीं नियम झुगारून पुढे आलेले आहेत. उदाहरण– भानवस म्हणजे स्वयंपाकघर. प्रो. किटेल कानडी कोशकाराच्या मतें हा शब्द संस्कृत–महानस "–यावरून झाला आहे: येथें प्रश्न– महानस– या शब्दाचें– भानवस– हें रूपांतर कोणत्या नियमाधारें झालें. दुसरें उदाहरण– उतान्हि– पहा. यांत खरें पाहतां तृष्णेचा संदर्भ आहे. परंतु शके १६७१ च्या पर्यायकोशावरून पहातां त्यांत त्यानें "स्तन" याचा संदर्भ दिला आहे. आम्हांला दुसराच घेणें प्राप्त आहे. कारण त्याकाळीं परंपरेनें तोच संदर्भ आलेला आहे. शिवाय अपभ्रंश हा अपभ्रंश आहे तो नियम झुगारून देणारच आहे हें प्रसिद्ध आहे.

(५) म्हणून- प्रथम– पाठशुद्धि– प्रयोगशुद्धि व नंतर ओवी संख्या– यांचा निर्णय अगोदर झाला पाहिजे.

---

❀ **मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.**

❀ **या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.**

❀ **मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.**



अनुक्रमणिका







प्रा. ना. ज. शेंडे

# महाभारत

## प्रास्ताविक

महाभारताचा उद्गम व वाढ याकडे पुष्कळ विद्वानांचें लक्ष लागलें आहे. या विद्वानांमध्यें विशेषेंकरून होल्ट्झ्मान्, लुडविग्, डाल्ह्मान्, याकोबी, फॉन श्रोडर, हॉप्किन्स्, मॅकडोनेल, सी. व्ही. वैद्य इत्यादींचीं नांवें विशेष प्रमुख आहेत. होल्ट्झ्मानच्या मतें महाभारत हें सम्राट अशोकाच्या दरबारीं असलेल्या बौद्ध कवीनें रचलें असून ब्राह्मणांनीं तें त्याच्याकडून घेऊन बौद्धांच्या विरुद्ध वाङ्मयीन शस्त्र म्हणून वापरलें. लुडविगच्या मतें सर्व महाभारत हें रूपक आहे. डॉल्ह्मान् या जर्मन् पंडिताच्या मतें, महाभारत हें एकाच व्यक्तीनें केलेलें काव्य असून व्हिटोर पिसानी सारखे पंडित त्या मताचा पुरस्कार करतात. याकोबीच्या मतें सूतांच्या काव्यरचनेवर पौराणिकांनीं उपाख्यानें जोडलीं. रावबहादूर वैद्य यांनीं ‘ Mahabharata a Criticism ’ या पुस्तकांत महाभारताच्या ३ आवृत्ती झाल्या असें लिहिलें आहे. प्रथम व्यासांनीं महाभारत आपल्या पांच शिष्यांना सांगितलें. यांतील कथाभाग ऐतिहासिक असावा. नंतर वैशंपायनानें (त्यांचा एक शिष्य) जनमेजय राजाच्या सर्पसत्रांमध्यें तें निवेदन केलें. याच्या ग्रंथाचे २४०० श्लोक असावेत. सौतीनें शेवटीं तें १ लाख श्लोक संख्येचें केलें. श्रॉडरच्या मतें प्रथम भारतीय युद्धासंबंधी स्फुट कवनें होतीं. नंतर इ. स. पूर्व ७ ते ४ शतकांमध्यें कौरव हे नायक असलेलें महाकाव्य तयार झालें. नंतर पांडव हे नायक असलेलें महाकाव्य तयार झालें. व त्यांत अनेक भाग घालण्यांत आले. हॉप्किन्सच्या मतें इ. स. पूर्वी ४ च्या शतकांत पांडव-कौरवांच्या युद्धावर रचलेलें एक काव्य तयार झालें. इ. स. पूर्वी ४०० ते २०० च्या सुमारास पांडव नायक असलेलें महाभारत रचलें गेलें. यांत अनेक कथाभाग गोंविले होते. इ. स. पूर्वी २०० ते इ. स. २०० पर्यंतच्या काळांत कृष्ण ही मुख्य देवता समजून महाभारत वाढविलें गेलें. २००–४०० इ. स. मध्यें अनेक उपदेशपर प्रकरणें घातलीं गेलीं. शांति व अनुशासन पर्वें यांच काळांत हल्लीच्या स्थितींत दिसतात तशीं गोवण्यांत आलीं.

या व इतर मतांमध्यें महाभारत या १ लाख श्लोकसंख्या असलेल्या महाकाव्याचा उगम कोठें आहे व तो कसा वाढत गेला याचीच मुख्यतः चर्चा केली आहे. त्यांत या सर्व घडामोडींचा कर्ता कोण या संबंधानें विशेष विवेचन नाहीं. म्हणजेच, या महाकाव्याला - ज्यांत नीतिशास्त्र, स्मृति व काव्य एकवटलीं आहेत याला कोण जबाबदार आहे याची उपपत्ति या विद्वानांच्या चर्चेत लागत नाहीं.

डॉ. सुकठणकर यांनीं प्रथमच या प्रश्नास तोंड पाडिलें. Epic Studies VI मध्यें ‘भृगु व भारत’ यांवर त्यांनी एक लेख लिहून याबद्दल चर्चा केली. त्यांच्या मतें महाभारतांत भृगु व भार्गव यांचें एक विशिष्ट स्थान आहे. यांच्या कथा सर्वस्वी उपाख्यानांतच सांपडतात. यांचें महत्त्व या महाभारतांतच प्रामुख्यानें दिसतें. त्यांचा महाभारताच्या मूळ कथेशीं फारसा संबंध पोंचत नाहीं. म्हणून महाभारत चालू स्थितींत येत असतां (in the formative period) त्यांवर भृगूंच्या संस्करणाचा फार परिणाम झाला व त्यामुळेंच भार्गवांचें वर्चस्व विशेषतः उपाख्यानांत दिसून येतें.

परंतु या चर्चेमध्यें, माझ्या मतें, आणखी ऊहापोह व्हावयास पाहिजे. भृगूंच्या संस्करणाचा परिणाम तर दिसतोच. शिवाय, आणखी कांहीं ब्राह्मणांचा त्यांवर काय परिणाम झाला आहे तेंहि पाहिलें पाहिजे. इतर कोणी ब्राह्मणांनीं या कार्यास हातभार लावला असल्यास तो कशा प्रकारचा होता व त्यांचा व भृगूंचा काय संबंध होता हेंहि पाहिलें पाहिजे. याच दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहण्याचा प्रस्तुत चर्चेचा विषय आहे.



अनुक्रमणिका






## महाभारताचीं संस्करणें

या ठिकाणीं प्रथमच हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे कीं, शतसाहस्री संहिता किंवा एक लाख श्लोकांचें महाभारत हें या चर्चेमध्यें गृहीत धरलें आहे. म्हणजे, शतसाहस्री संहिता कशी तयार करावी या प्रश्नाचा येथें ऊहापोह नाहीं. व्यास हे परंपरेनें आपणांस महाभारताचे कर्ते आहेत असें कळतें. परंतु प्रत्यक्ष महाभारत ग्रंथांमधील विधानांवरून हें खरें वाटत नाहीं. कारण व्यासांनीं भारत नांवाचा उपाख्यानरहित असा २४००० श्लोकांचा ग्रंथ रचला असें खुद्द महाभारतांतच स्पष्ट सांगितलें आहे. ( महाभारत १. १. १०२ –१०३ ). अर्थातच या मूळ भारताला ७६००० श्लोकांची जोड कोणी करून दिली हें पाहिलें पाहिजे. प्रस्तुत महाभारत निदान दोन अवस्थांमधून गेलें असलें पाहिजे. त्या दोन अवस्था म्हणजे भारत व महाभारत, चतुर्विंशतिसाहस्री व शतसाहस्री संहिता या होत. ( पहा – सुकठणकर Nala episode Thomes commemoration Volume 1939, page 302 ). अशा रीतीनें जरी दोन अवस्था मूळ कथा व इतर कथानकें यांच्या एकीकरणामुळें झाल्या असल्या तरी हल्लींचें महाभारत म्हणजे शतसाहस्री संहिता, यामध्यें एकप्रकारची सुसूत्रता दिसून येते. सुसंगतता, मुख्य पात्रें, कल्पना व कथावस्तु यामध्यें दिसून येते. महाभारताच्या मुख्य चौकटीमध्यें त्यांतील अनेक वर्ण्यविषय व्यवस्थित बसतात. महाभारतासारख्या जगांतील मोठ्या ग्रंथासंबंधानें ही सुसूत्रता व ही सुसंगतता सर्वसाधारण रीतीनेंच पहावयास पाहिजे. पण लक्षांत ठेवण्यासारखी ही गोष्ट आहे कीं, महाभारत हें अव्यवस्थित रीतीनें ठिगळें लावलेली गोधडी नसून कांहींतरी एका विशिष्ट हेतूनें त्यांतील निरनिराळे भाग एके ठिकाणीं जुळवलेलें सुंदर वस्त्र आहे. शतसाहस्री संहितेच्या रचनेच्या मागील ह्या एकसूत्रीपणामुळें त्यांवरील एकसूत्री संस्करणाची कल्पना येते म्हणजे ज्यांनी या महाभारतास शेवटच्या अवस्थेला नेलें, त्यांच्यामध्यें एकसूत्रीपणा होता व त्यामुळेंच त्यांत सर्वसामान्य सुसंगतता दिसते. भारतांतील मूळ गाभ्यांचा वर्ण्यविषय क्षात्रयुद्ध आहे. या युद्धांच्या बैठकीवर उभारलेलीं हीं कवनें अब्राह्मण असावींत. सत वगैरे राजांच्या दरबारीं असलेल्या अब्राह्मण कवींनीं हीं रचलीं असावींत. परंतु नंतर जेव्हां भारताचा महाभारतांत विस्तार, उपाख्यानांच्या जोडणीनें झाला तेव्हां त्यांत ब्राह्मणांचेंच प्रामुख्य दिसून येतें. महाभारतांतील उपाख्यानें वगैरेंचें हें ब्राह्मणीकरण निर्विवाद आहे. या दृष्टीनें प्रस्तुत महाभारताकडे पाहिलें असतां असें दिसून येईल कीं महाभारताच्या शेवटच्या संस्करणामध्यें ब्राह्मणांचा प्रमुख हात होता, व त्यांनी या ग्रंथांतील कथा, उपाख्यानें वगैरेंचें ब्राह्मणीकरण करून ब्राह्मणधर्माच्या प्रचाराकरितां त्याचा उपयोग करून घेतला. महाभारत हा ‘ ब्राह्मणधर्माचा ज्ञानकोश ’ आहे असें डॉ. सुकठणकरांनीं Epic Studies VI पृष्ठ ६८ वर बरोबरच म्हटलें आहे. म्हणून महाभारतांतील शेवटच्या संस्करणांतील एकसूत्रीपणा व वर्ण्यविषयांचें ब्राह्मणीकरण व त्याचें ब्राह्मणधर्माच्या प्रचाराच्या दृष्टीनें महत्त्व लक्ष्यांत घेतलें असतां, हे कोण ब्राह्मण असावेत, त्यांच्यामधील एकसूत्रता त्यांनीं कशी साधली असेल व हें सर्व त्यांनीं कशासाठीं व कां केलें असावें असे निरनिराळे प्रश्न उपस्थित होतात.

## महाभारतांतील ब्राह्मण

याच हेतूनें महाभारतांतील एकंदर ब्राह्मणांचें महत्त्वमापन मी केलें. हें महत्त्वमापन संख्येनें व गुणांनींहि केलें. या गणतीमध्यें महाभारतांत एकंदर २७१ निरनिराळे ब्राह्मण ८५०० वेळां येतात, असें आढळून आलें. नंतर या ब्राह्मणांचीं नांवें कांहीं ब्राह्मणकुलांकडे संबंधित होतात कीं काय हें पाहिलें. त्यांत असें दिसून आलें कीं, महाभारतांत ब्रह्मदेवाचे सात मानसपुत्र म्हणून ७ ऋषींचीं नांवें वारंवार येतात. ते ऋषि असेः– मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ. भृगु हा ब्रह्मदेवाच्या हृदयापासून उत्पन्न झाला. मनुस्मृतिमध्यें २१ प्रजापतींच्या मालिकेंत हे आठ ऋषी येतात. हे सात ऋषि शांतिपर्वांतील नारायणीय धर्मांतील सप्तचित्र शिखण्डीच होत. तेथें ह्या सात ऋषींवर सर्व विश्व अवलंबून आहे व ते नारायणाची प्रकृति होत असें वर्णन केलें आहे. ( महाभारत– १२· ३३४·३५–३६; १२·३३५·३० ). भृगुसहित हे आठ ऋषि मुख्य धरले तर हे मुख्य ऋषि व त्यांचे वंशज यांचें संख्यामापन महाभारतांत कसें आहे हें










पाहिलें. त्यांत असें दिसून आलें कीं, मरीचि (व त्याचे वंशज) महाभारतांत १७५ वेळां येतात, अत्रि ६०, अंगिरस ३२००, पुलस्त्य ३५, पुलह २०, क्रतु २०, वसिष्ठ ८३०, भृगु १५०० वेळां येतात. मूळ ऋषि व त्यांचे वंशज यांच्या नांवांची फक्त संख्याच जर लक्षांत घेतली तर असें दिसून येईल कीं, या ८ ऋषींपैकीं ५ म्हणजे मरीचि, अत्रि, पुलस्त्य, पुलह व क्रतु हे अगदीच अल्पसंख्याक आहेत. मरीचीच्या कुलांत त्याचा पुत्र कश्यप व त्याचे वंशज काश्यप हे येतात. एकटा मरीचि २६ वेळां येतो. पुलस्त्य, पुलह, व क्रतु यांची फारशी माहिती यांत येतच नाही. अत्रीचा अंगिरसांच्या कुलाशीं संबंध येतो. अत्रींच्या कुलांमधील भद्रा ही उतथ्य अंगिरसाला दिली होती. याशिवाय विशेष महत्त्वाचें त्या कुलासंबंधीं फार नाहीं. म्हणून संख्येच्या दृष्टीनें महत्त्वाचीं अशीं चारच कुलें आपणांस यांत दिसतात. हीं चार म्हणजे मरीचि (कश्यप), अंगिरस, भृगु व वसिष्ठ; व हींच महत्त्वाचीं कुलें, चार मुख्य गोत्रें म्हणून महाभारतांत सांगितलीं आहेत. यासंबंधी पुढील श्लोक पाहाः–

मूलगोत्राणि चत्वारि समुत्पन्नानि भारत ।
अङ्गिराः कश्यपश्चैव वसिष्ठो भृगुरेव च ॥
१२.२९६.१७.

ह्यांहि चार गोत्रांमध्यें पाहिलें असतां अंगिरस व भृगु हे संख्येच्या दृष्टीनें सर्वश्रेष्ठ आहेत हें दिसून येईल. कश्यप हा सगळयांत कनिष्ठ होय. (१७५). अंगिरस, भृगु व वसिष्ठ हे अनुक्रमें ३२००, १५००, ८३० वेळां येतात, म्हणून सर्वांत हे महत्त्वाचे आहेत. महाभारतांत इतर ब्राह्मणांपेक्षां यांचेंच महत्त्व जास्त आहे. हा संख्येच्या दृष्टीनें विचार झाला. त्यांच्या गुणांचें महत्त्वमापन (Qualitative evaluation) देखील हीच गोष्ट सिद्ध करतात हें पुढें दिसून येईल.

अंगिरसाच्या गोत्रामध्यें महाभारतांत खालील २५ व्यक्ति येतात :— अंगिरस्, अथर्वन्, अश्वत्थामन्, आंगिरसी, उतथ्य, कच, कक्षीवत्, गौतम, चण्डकौशिक, चिरकारी गौतम, दीर्घतमस्, द्रोण, बल, बृहस्पति, भरद्वाज, यवक्रीत, शारद्वत गौतम (कृप), श्रुतावती, संवर्त, सारस्वत, सुधन्वन्, पयस्य, शांति, घोर व विरूप. भृगूंच्या गोत्रामध्यें खालील १५ व्यक्ति आढळतात :— भृगु, कवि, शुक्र, च्यवन, और्व, ऋचिक, जमदग्नि, परशुराम, प्रमति, रुरु, शुनक, दधीच, मार्कण्डेय, विपुल, व उत्तङ्क.

आतां वसिष्ठाच्या कुलासंबंधी विचार करतां असें आढळून येईल कीं, व्यास स्वतः वसिष्ठ कुलोत्पन्न होत, व्यास -- शक्ति -- पराशर -- व्यास ही त्यांची वंशपरंपरा होय. व्यास स्वतः भारताचे कर्ते आहेत ही गोष्ट नमूद आहे, महाभारतांत (१.१.१०२-१०३). पुढील श्लोक आढळतो :—

चतुर्विंशति साहस्री चक्रे भारत संहिताम् ।
उपाख्यानैर्विना तावद्भारतं प्रोच्यते बुधैः ॥

अर्थात वसिष्ठकुलोत्पन्न व्यास यांनीं २४००० श्लोकांचें उपाख्यानाशिवाय असलेलें भारत रचलें व याच कारणावरून संख्यामापनामध्यें अंगिरस् व भृगुनंतर वसिष्ठांचें महत्त्व येतें. वसिष्ठांचें महत्त्व या ग्रंथांत असणें अगदी योग्य आहे; कारण, मूळ भारताचेंच पुढें मोठें भारत म्हणजे महाभारत झालें. वसिष्ठांचा भारताशीं संबंध फार जवळचा आहे. वसिष्ठानंतर ब्राह्मणांच्या आठ कुलांपैकीं दोनच महत्त्वाचीं अशीं कुलें शिल्लक राहातात. अंगिरस् ३२०० व भृगु १५०० वेळां ह्या दोघांमध्यें सुद्धां अंगिरसांचें महत्व जास्त आहे. एक सर्व द्रोणपर्व अंगिरसांपैकीं एकाची –द्रोणाची -- कर्तबगारी वर्णन करण्यांत खर्च झालें आहे.

## भृगु व अंगिरस यांचा संबंध

आतां या अंगिरस् व भृगु कुलांचा परस्परांशी काय संबंध आहे हें पाहिलें पाहिजे. तें पाहिलें असतां महाभारतांतील त्याच्या महत्वमापनाची योग्यता कळून येईल. या दोघांचा संबंध अथर्ववेदाशीं येतो, हे दोघेहि अंगिरस् व भृगु, हे इतिहासपूर्व काळांतील अग्नीचे उपासक होते. अथर्ववेदाचीं अथर्वाङ्गिरस्, भृग्वंगिरस्, व शेवटीं अथर्ववेद अशीं नांवें अनुक्रमें दिसून येतात. अथर्वाङ्गिरस् हें नांव त्या वेदांमध्येंच त्यास दिलेलें आढळतें – (अथर्ववेद, १०.७.२०). भृग्वंगिरस हें नामाभिधान आथर्वणांच्या ब्राह्मण ग्रंथांत व यज्ञकर्माच्या मार्गदर्शिकेंत आढळतें. भृग्वंगिरस् हें सामासिकपद, भृग्वंगिरोविद् या वारंवार येणाऱ्या शब्दांत सांपडतें व तेंच अथर्ववेदाचें दुसरें










नांव आहे. अथर्वांगिरस् या नांवांतून अथर्वन्‌च्या ऐवजी भृगु शब्द येऊन भृग्वंगिरस् हें नांव प्राप्त झालें. हा फरक कोणत्याहि कारणावरून घडून आला नसून, भृगु, अंगिरस् व अथर्वन् यांच्या परस्परांशीं असलेल्या निकटच्या नात्यामुळेंच आला आहे. हे तिघेहि (वस्तुतः दोघेच कारण अथर्वन् हा अंगिरसापैकींच आहे) अग्नि उत्पन्न करणें, व त्याचा यज्ञयागाकरितां उपयोग करणें, त्याचप्रमाणें अभिचार कर्मांचा प्रसार व वाढ करण्यांत निष्णांत होते. पुष्कळ ठिकाणीं ऋग्वेदांमध्यें हे तिघेहि एके ठिकाणीं सांपडतात. (ऋग्वेद. १०.९२.१०; ८.४३.१३). यजुर्वेदाच्या व ब्राह्मण-ग्रंथांच्या काळीं यांचा संबध इतका एकजीव झाला होता कीं भार्गवांना आंगिरस म्हणून व आंगिरसांना भार्गव म्हणून म्हणण्याचा प्रघात होता. उदाहरण शतपथब्राह्मणा-(४.१.५.) मध्यें च्यवन ऋषींचा भार्गव व आंगिरस अशा दोन्ही कुलांतील अभेद व्यक्त करणाऱ्या नांवांनीं निर्देश केला आहे. भृग्वंगिरस् या अभिन्न कुलांतील व्यक्तींचें महत्त्व विशेषतः यज्ञ-संस्थेंत दिसून येतें. यांच्या शिवाय यज्ञसंस्था चालतच नाही. गोपथ ब्राह्मणांत एके ठिकाणीं (१.१.१-१५) म्हटलें आहे कीं भृग्वंगिरसांशिवाय यज्ञसंस्था म्हणजे पाय कापून टाकलेला चतुष्पाद प्राणीच. तात्पर्य यांचेंच यज्ञसंस्थेंत प्रामुख्य होतें. यांनीं यज्ञसंस्थेंत काय फरक केले हें अथर्ववेदांतील निराळयाच यज्ञांवरून दिसून येईल. अर्थातच हा विषय माझा निराळया संशोधनाचा आहे व येथें तो अप्रस्तुत आहे.

भृग्वंगिरस् हें उभय कुलांतील ऐक्य निदर्शक अभिधान, यज्ञसंस्थेंतील त्यांचें महत्त्व व कार्य, अभिचार व अस्त्रविद्येंतील त्यांचें प्रावीण्य व प्राधान्य यांवरून वेदकाळापासून त्याची एकी दिसून येते. आथर्वण ग्रंथाचा मुख्य उद्देश भृगु व अंगिरस् यांचें व नंतर ब्राह्मणांचें महत्त्व प्रस्थापित करण्याचा दिसतो. अथर्ववेद व आथर्वण ग्रंथ यांचे प्रणेते भृग्वंगिरस असल्यामुळें हें अगदीं शक्य आहे. अथर्ववेदास प्रथम वेद अशी मान्यता नव्हती. वेदांना त्रयी म्हणत. परंतु भृग्वंगिरसानीं आपल्या कर्तबगारीनें अथर्ववेदास वेद-मान्यता मिळवून दिली. अथर्ववेदाचें स्वरूप त्रयीपेक्षां निराळें आहे. तो कांहीसा ऐहिक (Secular) स्वरूपाचा वेद आहे. त्रयीमध्यें यज्ञयागाचेंच प्राधान्य आहे. अशा रीतीनें सर्व समाजाच्या धार्मिक आकांक्षा व श्रद्धा ज्यामध्ये ग्रथित केल्या आहेत व म्हणूनच उच्च यज्ञयागादि धर्मग्रंथांत समावेश न झालेल्या अथर्ववेदाला मान्यता मिळवून दिली हें भृग्वंगिरसांचें प्रथम कार्य होय. या त्यांच्या कार्याचा येथें मुद्दाम उल्लेख केला आहे. कारण यावरूनच त्यांच्या दुसऱ्या कार्याची योग्यता कळून येईल. हें दुसरें कार्य म्हणजे धर्मग्रंथांची थोरवी असलेल्या महाभारतासंबंधीं होय.

वेदकालांतून महाभारताकडे आपण वळलों असतां आपणांस असें दिसून येईल कीं भृग्वंगिरसांची एकी याहि कालखंडांत दिसून येते. भृग्वंगिरस हें नांव व त्यांची समान उत्पत्ति महाभारतांतहि अनेक वेळां वर्णिली आहे. अथर्ववेदाचें त्रयीपेक्षां जास्त महत्त्व दाखविण्याचें त्यांचें कार्य नहुषाच्या कथेवरून येथेंहि स्पष्ट होतें. (पहा: महाभारत ५.१८,५-८) या कथेमध्यें इंद्र अथर्वाङ्गिरस मुनींना वर देऊन सांगतो कीं, अथर्ववेद अथर्वांगिरस् वेद म्हणून मानला जाईल व त्रयीपेक्षां त्याला जास्त मान्यता मिळेल. या दोघा ऋषिकुलांतील संबंध येथेंहि अभिन्नत्वानेंच दाखविला आहे. च्यवन, गृत्समद, दधीच यांना आंगिरस अथवा भार्गव असेंच म्हटलें आहे. महाभारतांत (१३.९१.१) एके काळीं सर्व जग भृग्वंगिरसांच्या वंशजांनी भरलें होतें असें स्पष्ट म्हटलें आहे. दुसरें असें कीं भृगु व अंगिरस् या कुलांतील व्यक्ति दुसऱ्या कोणत्याहि कुलांतील व्यक्तीबरोबर निदश पावत नाहींत. महाभारतांत तर इतर कोणत्याहि ब्राह्मणकुलानें न केलेली अशी अस्त्रविद्यापारंगतता यांनींच संपादन केली. इतकेंच नव्हें तर ती क्षत्रियांना शिकविली असें दिसून येईल. अथर्ववेदासंबंधीं त्यांचें कार्य लक्षांत घेतां ते धार्मिक बाबतींत सुधारक होते व ब्राह्मण्याचा त्यांना अत्यंत अभिमान असून ब्राह्मणांचे ते एकमेव पुढारी होते असें आढळून येईल.

### ऋग्वेदांतील भृग्वंगिरस्–

ऋग्वेदामध्यें (१०.६२.४) अंगिरस् हे देवपुत्र व अग्निपुत्र असून मंत्रद्रष्टे आहेत. त्यांचा देवांशीं व मानवांतील अथर्वन् व भृगु यांच्याशीं संबंध आहे (ऋग्वेद ३.४४.४; ३५.१४; १०.१८.३; १०.१४.६). ते ब्राह्मण ऋत्विज असून त्यांच्यामुळेंच यज्ञसंस्था अमर झाली. त्यांनी यज्ञसंस्था प्रस्थापन केली. अग्नि,






अनुक्रमणिका





इंद्र व उषा यांना अंगिरस्तम म्हणतात. अथर्वन् यानें यज्ञांतील निरनिराळे विधि प्रस्थापित केले. ऋग्वेदांत बृहस्पति आंगिरस यांच्या स्तुति करतां सबंध ११ सूक्तें रचिलीं आहेत. याच्या शिवाय यज्ञ सिद्ध होत नाहीं. भरद्वाज हा बार्हस्पत्य असून ६ व्या मंडलाचा द्रष्टा आहे. भृगु व भार्गव अनेक सूक्तांचे द्रष्टे आहेत. भृगूंनीं अग्नि प्रथम मानवांना दिला. भृगु, अथर्वन् व अंगिरस यांना ऋग्वेदांतील मंत्रद्रष्टे सोम आवडणारे पितृ असें म्हणतात. गृत्समद हा प्रथम अंगिरस व नंतर भार्गव असून हा ऋग्वेदाच्या दुसऱ्या मंडळाचा द्रष्टा आहे. जमदग्नि भार्गव हा ऋग्वेदांतील अनेक सूक्तांचा द्रष्टा आहे.

## महाभारतांतील भृग्वंगिरस् व नवीन सिद्धांताचा उपन्यास

मागील ऊहापोहावरून भृग्वंगिरस हे ब्राह्मणसमाजांतील एक वजनदार व महत्वाचे पुढारी होते असें दिसून येईल. महाभारतांत भृगु व अंगिरसांमध्यें थोडा स्वाभाविक भेद दाखविला आहे. भार्गव हे महाभारतांत अतिशय रागीट, तेजस्वी, मनस्वी, न वांकणारे व सूडबुद्धि असणारे ऋषि दाखविलेले आहेत. अंगिरस यांच्या मानानें सौम्य पण तितकेच तेजस्वी व सन्माननीय पुढारी आहेत. भारतीय युद्धामध्यें आंगिरसांपैकीं कृप, द्रोण व अश्वत्थामा हे मोठे लढवय्ये व शस्त्रास्त्रविद्येचे आचार्य व पुरस्कर्ते होते. इतर ब्राह्मणांपैकीं कोणीहि या क्षेत्रांत कामगिरी केल्याचें दिसत नाहीं. या जोड ब्राह्मण कुलांची कर्तबगारी महाभारताच्या विकासाच्या दृष्टीनें फार महत्त्वाची आहे. अंगिरस् हा अंगिरस् कुलाचा प्रमुख व ब्राह्मणांचा पुढारी होता ( महाभारत, १४.३५.१७ ). नीति व धर्मशास्त्र त्यालाच प्रथम ज्ञात झालें ( महाभारत. १२·१२२·३६–४९). तो सप्तचित्र शिखंडीपैकीं एक होता. तो एक धार्मिक सुधारक होता. त्यानें तीर्थयात्रा व उपावास यांनीं यज्ञाइतकेंच फल मिळतें असें प्रतिपादन केलें. (महाभारत १३.२६.७१; १०६.३५-५०) यज्ञयाग करणें हें अति कष्टाचें व खर्चाचें म्हणूनच सर्वसाधारण मनुष्यास तें करण्यास अशक्यप्राय होऊन बसलें होतें. अंगिरसानें सर्वसाधारण लोकांना यज्ञाइतकेंच फल प्राप्त करून देणारे साधे आचार विधि उपदेशिले. अर्थातच ही मोठी सुधारणा होती. यज्ञयाग हाच त्याकाळीं रूढ धर्म होता. पण तो समाजांतील साधारण प्रतीच्या मनुष्यास प्राप्त होणें कठीण होतें. अशा रीतीनें नवीन व त्याच फलाचा आचारधर्म प्रत्येकास शक्य व आवडणारा होता. यामुळें अंगिरसाला जनतेचें पुढारीपण लाभलें. अंगिरसाच्या कुलांतील दुसरी व्यक्ति अथर्वन्. यानें अथर्ववेदाला वेदमान्यता प्राप्त करून दिली व अथर्वन् ऋत्विजाला यज्ञांतील भाग मिळूं लागला. अथर्ववेदांत जास्त सूक्तें अथर्वन् याचीं आहेत. म्हणूनच त्याला अथर्ववेद म्हणतां येईल. या अथर्ववेदांतील एकंदर विचारप्रवाहाचा महाभारतावर फारच परिणाम झालेला दिसतो. महाभारतांतील मुख्य कथासूत्र भारतीय युद्ध हें होय. त्यांत भाग घेणारे मुख्यतः कौरव व पांडव यासंबंधींच्या कथा यामध्यें येणारच. मागें भारतांतील विविधतेतील व वैविध्यांतील एकसूत्रीपणाचा निदश केला होता. त्याचाच पुनः निर्देश करून असें म्हणतां येईल कीं, या एकसूत्रीपणांतहि भृग्वंगिरसांचाच हात होता. मुख्य कथासूत्र जें भारतीय युद्ध, त्यामधील नायकांचा, पांडवांचा जन्म हा अथर्ववेदांच्या कांहीं मंत्रांच्या उच्चारण्यामुळेंच झाला. राजकुमार कौरव व पांडव यांचें शिक्षण अंगिरसकुलांतील प्रमुख आचार्य द्रोण यांच्या हस्तें झालें. त्यांनी शिकवलेली अस्त्रविद्या ही आथर्वणच होती. परशुराम यालाहि आथर्वण अस्त्रविद्या देणगी म्हणून मिळाली. याच आथर्वण अस्त्रविद्येवर भारतीय युद्ध लढलें गेलें. या लढाईंत आंगिरसांतील श्रेष्ठ द्रोणाचार्य सेनापती म्हणून लढले. अथर्ववेदांतील पुरोहिताचें राजकीय महत्त्व राजनैतिक शास्त्रांतील महत्वाचा धडाच शिकवितें. अशा ह्या अथर्ववेदाचें तत्कालीन समाजांत किती महत्त्व होतें हें दिसून येईल. अशा ह्या अथर्ववेदाचे संपादक भृग्वंगिरस होते. महाभारतांमध्यें अथर्ववेदांला प्राधान्य दिलें आहे. अथर्ववेदाचें महत्त्व तो तत्कालीन आचारधर्माची बिनचूक माहिती देतो म्हणून विशेष आहे. हा सर्व समाजाचा वेद आहे. महाभारतांमध्यें बृहस्पति व शुक्र हे मोठे आचार्य, नीति व राज्यशास्त्रज्ञ होते असें वर्णन आलें आहे'. हे श्रीकृष्णाच्या विभूती होते. बृहस्पतीनें सप्तचित्रशिखंडीच्या शास्त्राचा ( नारायणीय धर्म ) प्रचार केला. तो उपरिचरवसूंचा उपदेशक होता. भगवान्









अनुक्रमणिका

कृष्ण स्वतः शुक्राचार्यांचेच वंशज होत. अशा रीतीनें भागवतधर्म व महाभारतांतील धर्मनीतिसंबंधाचे विचार भृग्वंगिरसांच्या मुळेंच आले असावेत. परशुराम, द्रोण, अश्वत्थामन् व कृप यांनी आथर्वण अस्त्रविद्या आत्मसात केली होती. महाभारतांतील अत्यंत विचारप्रवर्तक असे भाग शांति व अनुशासन पर्वे होत. या पर्वांमधील राजनैतिक व आध्यात्मिक विचार हे भीष्मांनीं, शुक्र व बृहस्पति यांच्या सिद्धांतांचा सारांश म्हणूनच उपदेशिले आहेत. परशुराम हा एके समयीं कौरवांच्या सभेत हजर होता. भीष्म व कर्ण हे त्याचे विद्यार्थी होते. द्रोण, अश्वत्थामन्, कृप—सर्व आंगिरस हे कौरवपांडवांचे आचार्य होते. यावरून असें समजून येईल कीं भृग्वंगिरसांचें वर्चस्व महाभारतांतील मूल सूत्रांवर व त्याचप्रमाणें आनुषंगिक उपाख्यानावरहि दिसून येतें. म्हणजे भारताचें महाभारतामध्यें रूपांतर होतांना त्याचा मूळ गाभा व इतर विस्तार यावरहि या दोघां ब्राह्मणकुळांतील व्यक्तींचा हस्तप्रक्षेप झाला होता. अशा रीतीनें भारताच्या गाभ्याकडे म्हणजे भारतीय युद्धाकडे पहा, त्यांतील नीतिशास्त्राकडे पहा, त्यांतील वैष्णव धर्मविचाराकडे पहा या प्रत्येक क्षेत्रामध्यें या भृग्वंगिरांचेंच प्राधान्य दिसून येईल. भृगु हा स्वतः मोठा तत्त्वज्ञानी होता. अंगिरस् व भृगु व त्यांच्या कुलांतील व्यक्तींनी आचारधर्माचा पद्धतशीर पाया या महाभारतांत घातला व लोकांना आपल्या परंपरागत वैदिक आचरणानें पटवून दिलें कीं, हाच तो कालमानाप्रमाणें बदलणारा जुना वैदिक धर्म ! एष धर्मः सनातनः । अशा खात्रीनें तो लोकांना पटविला.

दुसरी महत्वाची गोष्ट अशी कीं, सर्व धर्मनीति वैष्णव भागवत धार्मिक विचार, हे महाभारतांत कथारूपानें आहेत. जैन व बौद्ध आचार्यांनीं आपल्या धर्माचा प्रचार करतांना तो समाजाच्या खालच्या थरापर्यंत जावा म्हणून कथाप्रकाराचा आश्रय घेतला होता. भृग्वंगिरसांना आपला वेदमान्य, पण नवीन आचारधर्म लोकांमध्यें प्रसृत करतांना अशा प्रकारच्या वाङ्मयाची जरूरी होती. त्यांना भारतासारखें सर्व समाजाच्या भावना हलवून सोडणारे कथानक आयतेंच उपलब्ध होतें. त्यांनी त्याचा उपयोग करून घेतला. अनेक दृष्टींनीं भारतीय युद्ध हें अभूतपूर्व युद्ध होतें. त्याच्या वर्णनाची गोडी अवीट होती. तें क्षात्रयुद्ध होतें. ऋग्वेदांतील क्षत्रियांच्या युद्धाप्रमाणें, पौरोहित्याकरतां लढलेलें युद्ध नव्हतें. या दृष्टीनें व त्यांमधील हत्येमुळेंच तो सर्व प्रसंग सर्वांना रोमांचकारी वाटला असला पाहिजे. अशा भारतीय युद्धांसारख्या प्रसंगांवरील कथावाङ्मयाचा भृग्वंगिरसांनीं धर्मप्रचाराकरितां उपयोग करून घेतला असल्यास नवल नाहीं. भृग्वंगिरस हे त्यांच्या धार्मिक सुधारणेमुळें, अभिचार व अस्त्रविद्या यांच्या उघड उघड स्वीकारानें, पुरोहिताच्याद्वारें राजदरबारीं आपल्या अभिचार व अस्त्रविद्येच्या उपयोगानें, समाजामध्यें मोठे वजनदार बनून राहिले असावेत. इतकेंच नव्हें तर त्यांची भीति क्षत्रियांनासुद्धां वाटत असावी. क्षत्रियसुद्धां त्यांना वचकून असत. येथें और्व भार्गवाची कथा लक्षांत आणावी. म्हणून क्षत्रियांनासुद्धां ते आदेश देऊं शकत. ब्राह्मणधर्माचें तर त्यांनीं पुनरुज्जीवन केलें होतें आणि म्हणूनच समाजांतील ब्राह्मणांनीं व क्षत्रियांनीं त्यांना शिरोधार्य मानिलें. याच हेतूनें भगवद्गीतेमध्यें भृगु, शुक्र, बृहस्पती व राम हे श्रीकृष्णाच्या विभूति म्हणून वर्णिल्या असाव्यात. सर्व देशांतील लोकप्रिय वाङ्मयप्रकाराप्रमाणें भारत सुद्धां द्रवरूप वाङ्मयीन कथा वस्तु ( fluid text ) असावी, व ती काळप्रसंगानें लोकांच्या उपयोगी आणतां यावी म्हणूनच भृग्वंगिरसांना भारतासारख्या कथात्मक वस्तूचा, सनातन वैदिक धर्माचा आधुनिक व सोप्या स्वरूपांतील धर्माच्या प्रचाराकरतां उपयोग करून घेतां आला. तात्पर्य असें कीं, भृग्वंगिरसांनीं अथर्ववेदाला चवथा वेद म्हणून मान्यता मिळवून दिल्यावर महाभारतालासुद्धां सुसंघटित धर्मप्रचाराचें साधन म्हणून पाचव्या वेदाची योग्यता प्राप्त करून दिली. अशा प्रकारच्या सनातन धर्माच्या नव्या अवताराच्या संघटित प्रयत्नांची जरूरी होती. जुना वैदिक धर्म, त्यांतील कर्मकाण्डामुळें जनतेला पेलेनासा झाल्यामुळें बहुजन समाज सनातन धर्मविन्मुख झाला असावा. बौद्ध व जैन धर्मियांच्या पूर्वजांचे समाजास अगदी खालच्या थरापर्यंत हादरे बसत होते. सर्व जनता एकप्रकारें धार्मिक अराजकांत सापडली. अशावेळीं भृग्वंगिरसांनीं त्यावेळीं जनतेचे पुढारी बनून आपल्या सामर्थ्यप्रभावानें क्षत्रियांनाहि आत्मसात् करून भागवत धर्माचा पुरस्कार केला. वास्तविक बौद्ध, जैन मतासारखाच भागवतधर्म-











सुद्धां ब्राह्मण धर्माविरुद्ध क्षत्रियांनीं पुरस्कारिलेला पंथ होता; पण त्यांतल्या त्यांत सुवर्णमध्य साधण्याच्या भागवतधर्माच्या हातोटीमुळें ब्राह्मणांना तो जवळचा वाटला, व त्यांनीं त्याला पूर्ण आश्रय दिला. या नव्या धर्माचें महाभारत हें आश्रयस्थान व भगवद्गीता हा आधारभूत ग्रंथ झाला.

अशा प्रकारच्या परिस्थितींत भृग्वंगिरसांना भारत हा मोठा लोभनीय ठेवा वाटला असावा व म्हणूनच त्याचें महाभारतांत रूपांतर ते करूं शकले. यावरून महाभारतांत अनेक प्रकारच्या कथाप्रसंगामुळें जरी विविधपणा व वैचित्र्य आलें असलें तरी भृग्वंगिरसांच्या एकसूत्रीपणाच्या पुरस्कारामुळें त्यांतील कल्पना, ध्येय व चित्रण यामध्यें सुसंगतपणा आला आहे. महाभारताचा विस्तार अशा रीतीनें भृग्वंगिरसांच्या देखरेखीखालींच झाला असला पाहिजे.

नंतर असा प्रश्न उत्पन्न होतो कीं या समयीं इतर कोणी ब्राह्मण यांच्या तोडीचे नव्हते काय ? याचें उत्तर नाहीं असेंच आहे. आपण मागें संख्यामापनाच्या प्रमाणावरून भृग्वंगिरस् हे सर्वांपेक्षां जास्त प्रमाणांत महाभारतांत दिसतात. यावरून असें दिसून येईल कीं भारताच्या विस्ताराच्या समयीं त्यांवर भृग्वंगिरसांचेंच वर्चस्व आधिक्यानें होतें व त्यांनीं आपल्या ब्राह्मण्याच्या अभिमानास अनुसरून, ब्राह्मणांच्या वर्चस्वाच्या कथा, आख्यायिका इत्यादि त्यांत गोविलीं असावींत. यावरून त्यांचा हेतु महाभारताला ब्राह्मणांच्या शक्तीचा, आचाराचा, पाण्डित्याचा ज्ञानकोश करण्याचा असावा हें खालील उद्‌गारांवरून स्पष्ट होईल. यदिहास्ति तदन्यत्र, यदिह नास्ति न तत्क्वचित् । १-५६-६३ भृग्वंगिरसांच्या या हेतूमुळेंच यांत अनेक ब्राह्मणांच्या कथा आल्या आहेत. त्याचप्रमाणें क्षत्रियांचा मोठेपणा यांत आहेच. याच हेतूमुळें वैविध्यांतील एकत्व यांत दिसून येतें.

डॉ. सुकठणकर म्हणतात त्याप्रमाणें महाभारत आज कमीत कमी २००० वर्षें अलौकिक लोकप्रियता अनुभवत आहे. याचें कारण त्यांतील रूक्ष तात्त्विक, नैतिक किंवा धार्मिक चर्चा नव्हे किंवा तो इतिहास आहे म्हणूनच नव्हे तर तें एक काव्य आहे म्हणून 'कृतं मयेदं काव्यं भगवन् परमपूजितम् । असें म्हटलेंच आहे. संपादक भृग्वंगिरसांनीं सूत हा परंपरागत इतिहास, काव्य याचा गायक कायम ठेवला. ते स्वतः त्याच्या मागें राहिले. सूत हे प्रत्येक राजाच्या पदरीं उत्स्फूर्त काव्य करणारे, सार्वजनिक ठिकाणीं अशा इतिहास व वंशज्ञान यांच्या आधारावर काव्यें रचण्यांत व म्हणण्यांत कुशल होते. अशा रीतीनें महाभारत हें सूताच्या मुखांतून वदविण्यांत या भृग्वंगिरसांचे अनेक हेतु सफल झाले. काव्याला परंपरागत सनातनवृत्ति येऊन जुन्या धर्मप्रमाणेंच नव्या धर्माचरणाचें स्वागत झालें. स्वभावतः पुराणप्रिय असलेल्या बहुजनसमाजाकडून त्याची संभावना झाली. अशा रीतीनें सूत हा परंपरागत रूढी, आचाराचा गायक, शौनकाच्या नैमिष्यारण्यामध्यें येतो व आपण निरनिराळ्या तीर्थयात्रा केल्या असून समंतपंचकाहून नुकताच आलों आहे असें सांगून शौनकाची जिज्ञासा वाढवितो. तो निरनिराळ्या कुलांची माहिती आपणांस आहे असें सांगतो. तेव्हां शौनक त्याला भार्गवांचा इतिहास निवेदन करण्यास विनंति करतो. सूत तें मान्य करून प्रथम भार्गवांचें इतिवृत्त कथन करतो. शौनकानें भार्गवाचें वृत्त त्याच्याकडून प्रथम वदवावें हें भार्गवांच्या अहंकारवृत्तीस धरूनच आहे.

शेवटीं तात्पर्य हें कीं भृग्वंगिरसांनी जोडीनें महाभारताचें संस्करण करून त्यांत धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, व ब्राह्मण्याचा ज्ञानकोश याचा समावेश करून शतसाहस्री संहितेच्या पदवीस आणून सोडलें. या चर्चेंतील पुढील मुद्दे निर्णायक ठरतील:—

( १ ) भृग्वंगिरसांचें संख्याबाहुल्य, ( २ ) त्यांच्या दोघांमधील एकी, ( ३ ) त्यांचा भारतीय पुराणांमधील प्रमुख प्रसंगांशीं संबंध. ( ४ ) आथर्वण आचार व विचार यांचें महाभारतांतील प्रमुख व्यक्ति व प्रसंग यांच्यावरील परिणामकारक वर्चस्व. ( ५ ) सनातन धर्मामध्यें परिस्थितिप्रमाणें बदल करून नवीन आचारधर्माची जनतेसाठी स्थापना. ( ६ ) द्रोण, अश्वत्थामा, कृप, यांचें भारतीय युद्धामधील प्रामुख्य. ( ७ ) तत्कालीन सामाजिक धार्मिक परिस्थिति, जिच्यामुळें या वीर्यशाली ब्राह्मणांनीं भारताला हातीं घेऊन प्रचंड धार्मिक क्रांति थोपवून धरून सनातन धर्म नवीन स्वरूपांत कायम राखला.

या सर्व मुद्यांवरून वर सांगितलेली उपपत्ति समाधानकारक आहे अशी खात्री होईल. रामायण व मनुस्मृति या ग्रंथावरील त्यांच्या संस्करणावरून वरील विचारसरणीला पुष्टि मिळेल.








श्री. भा. कृ. देसाई

# केनेडी यांच्या विजयाच्या निमित्तानें --

सिनेटर जॉन केनेडी यांची अमेरिकेच्या अध्यक्षपदीं झालेली निवड ही आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची घटना आहे. आज जगभर लोकशाही राष्ट्रें विरुद्ध आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळ यांचा जो अविरत संघर्ष चालू आहे, त्यांत लोकशाही राष्ट्रांच्या नेतृत्वाची धुरा दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेच्या खांद्यावर येऊन पडली आहे. त्यामुळें अमेरिकेचें राष्ट्राध्यक्षपद हें जागतिक राजकारणांतील अत्यंत महत्त्वाचें व जबाबदारीचें स्थान आहे. आइझेनहॉवर हे १९५२ सालीं प्रथम राष्ट्राध्यक्षपदीं निवडून आले ते कोरियांतील युद्ध थांबावण्याचें व तेथील अमेरिकन सैनिकांना परत स्वदेशीं आणण्याचें आश्वासन देऊन. आइझेनहॉवर यांच्या कारकीर्दींत परराष्ट्रीय धोरणाचीं सूत्रें प्रामुख्यानें डलेस यांच्या हातीं होतीं. आइझेनहॉवर यांच्या कारकीर्दीच्या सुरुवातीस रशियांत स्टॅलिनशाहीचा अंमल चालूच होता. स्टॅलिनच्या डावपेचांना डलेस यांचें कणखर व एकमार्गी कम्युनिस्ट-विरोधाचें धोरण योग्यहि होतें. पण १९५३ च्या मार्च मध्यें स्टॅलिन मृत्यू पावल्यानंतर रशियांत आणि पूर्व युरोपांत अनेक उलथापालथी घडून आल्या. १९५७–५८ सालीं रशियांतील सामुदायिक नेतृत्व संपुष्टांत येऊन क्रुश्चेव्ह यांच्या हातीं कम्युनिस्ट हुकूमशाहीची सत्ता एकवटली गेली. क्रुश्चेव्ह यांच्या कल्पक व लवचिक परराष्ट्रीय धोरणापुढें डलेस यांचा धोपटमार्गी व लष्करवादी कम्युनिस्टविरोध आडमुठा ठरू लागला. क्रुश्चेव्ह यांनीं स्टॅलिनचें सशस्त्र आक्रमणाचें व ताठर विरोधाचें धोरण टाकून दिलें, व त्याऐवजीं वरपांगी सलोख्याचें व आशियाई तटस्थेतला उत्तेजन देऊन युरोप व आशिया यांच्यात फूट पाडण्याचें कावेबाज धोरण स्वीकारलें. क्रुश्चेव्ह यांच्या या चतुर धोरणापुढें डलेस यांच्या एकांगी धोरणाचा टिकाव लागूं शकला नाहीं. परिणामीं आंतरराष्ट्रीय राजकारणांत अमेरिकेची इभ्रत उताराला लागली. डलेस यांच्या नंतर हर्टर हे परराष्ट्र मंत्री बनले. पण त्यांनीहि मूलतः डलेस यांचेंच धोरण चालू ठेवलें. याचा परिणाम म्हणजे अमेरिकेची जागतिक राजकारणांतील पीछेहाट चालूच राहिली. अमेरिकन सरकारच्या United States Information Agency नें कांहीं महिन्यांपूर्वी युरोपांतील कांहीं देशांत पहाणी करून काढलेला अमेरिकेच्या प्रतिष्ठेला ढळ पोंचला असल्याचा निष्कर्ष या दृष्टीनें सूचक होता. याच सुमारास जपान वगैरे आशियाई राष्ट्रांत झालेलीं अमेरिका विरोधी जाहीर निदर्शनें व दक्षिण अमेरिकेंत अमेरिकेविरुद्ध पसरलेला असंतोष, हेहि याच निष्कर्षाला बळकटी आणणारे पुरावे होते.

या खळबळजनक पार्श्वभूमीवर यावेळीं अमेरिकन राष्ट्राध्यक्षपदासाठीं निवडणूक झाली. साहजिकच या निवडणुकीच्या प्रचारमोहिमेंत परराष्ट्रीय घडामोडींना प्रमुख स्थान लाभलें होतें. विशेषतः गेल्या मे महिन्यांत पॅरिसमधील श्रेष्ठी–परिषदेच्या वेळीं क्रुश्चेव्ह यांनीं असभ्य रीतीनें केलेला अमेरिकन राष्ट्राध्यक्षांचा वयक्तिक अपमान व ऑक्टोबरमधील यूनो अधिवेशनांत भाग घेऊन त्यांनीं अमेरिकेवर केलेली हीन आगपाखड–या घटनांनीं रशिया-अमेरिका संबंधांवर अमेरिकन जनतेचें लक्ष केंद्रित केलें होतें. त्यामुळें या निवडणुकीच्या द्वारा अमेरिकन जनतेनें अप्रत्यक्षपणें अमेरिकेच्या आजवरच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दलचा आपला कौल दिला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पण अमेरिकन जनतेचा कौल केनेडी यांच्या बाजूनें पडला असला तरी या निवडणुकांचे निकाल पहाता, तो कौल आइझेनहॉवर यांच्या धोरणाविरोधी होता असें म्हणतां येत नाहीं. केनेडी हे अत्यल्प बहुमतानें -सुमारे अर्धा टक्का बहुमतानें- निवडून आले आहेत. म्हणजे हा कौल आजवरच्या अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणाविरोधी मूलतः नाहीं तर त्या धोरणाला नवें वळण











अनुक्रमणिका

व नवा अर्थ देण्याच्या बाजूनें असा आहे. शिवाय, आइझेनहॉवर यांच्या कारकीर्दीतहि अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण हें नेहमींच दोनहि पक्षांच्या संमतीनें व सल्ल्याने आंखलें जात असे. म्हणज निक्सन आणि केनेडी यांच्या परराष्ट्रीय धोरणाचीं मूलभूत सूत्रें अगर दिशा भिन्न नव्हत्या. अमेरिकेच्या राष्ट्रीय हितसंबंधानुसारच कोणालाहि परराष्ट्रीय धोरण आंखावें लागत असल्यामुळें हें मूलभूत मतैक्य अपरिहार्यच होतें. दोघांच्या परराष्ट्रीय धोरणांत फरक होता तो फक्त तपशीलाबाबत व डावपेचाबाबत. या फरकाचा परिणाम आतां इतकाच होईल कीं केनेडी यांच्या कारकीर्दींत अमेरिकन परराष्ट्रीय धोरण पूर्वीप्रमाणें केवळ बचाऊ व नकारात्मक वृत्तीनें हाताळलें जाणार नाहीं; व त्याला कल्पक व विधायक वळण लागण्याची शक्यता आहे. या दृष्टीनें पहातां केनेडी यांच्या राजकीय परिवारांत येल व हॉवर्ड विद्यापीठांतील अनेक अर्थशास्त्रज्ञांचा व राजनीतिशास्त्रज्ञांचा भरणा आहे ही गोष्ट आशादायक आहे. त्यामुळें यापुढें अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण जास्त धाडशी व प्रयोगशील बनण्याची शक्यता आहे.

केनेडी यांची अध्यक्षपदीं निवड झाल्याबरोबर रशियन नेत्यांचा व वृत्तपत्रांचा अमेरिकाविषयक सूर बदलला ही घटनाहि सूचक आहे. केनेडी यांच्या विजयाबद्दल क्रुश्चेव्ह यांनीं त्यांचें तत्परतेनें अभिनंदन केलें आहे, व पुन्हां रशिया-अमेरिका मैत्रीचे गोडवे गाण्यास सुरुवात केली आहे. केनेडी यांना क्रुश्चेव्हतर्फे रशिया-भेटीचें निमंत्रण धाडलें जाणार असल्याची व पुढील वर्षी पुन्हां श्रेष्ठी-परिषद भरवण्याचा क्रुश्चेव्ह यांचा मनोदय असल्याची वार्ताहि प्रसिद्ध झाली आहे. याचा अर्थ व केनेडी व क्रुश्चेव्ह भेटीनें आंतरराष्ट्रीय समस्यांचा उकल सुलभ होईल असा नव्हे, तर रशिया-अमेरिका यांच्यामधील राजनैतिक संबंध सुधारतील असा आहे. केनेडी यांच्या कारकीर्दीच्या सुरुवातीस क्रुश्चेव्ह यांनीं पुन्हां मैत्रीचें जुनें धोरण स्वीकारण्याचें कारण केनेडी यांची राजवट नवी असल्यामुळें त्यांना आइझेनहॉवर यांच्या कारकीर्दीतील अमेरिकेचे अनेक विषयांवरील पवित्रे बदलतां यतील व नव्या वातावरणांत अनेक प्रश्नांचा पुन्हां नव्यानें ऊहापोह करतां येईल. या वातावरणांत अणुस्फोटबंदी, निःशस्त्रीकरणकरार, वगैरे तांतडीच्या प्रश्नांवर समंजसपणें तडजोड करतां आल्यास पहावी हा क्रुश्चेव्ह यांचा हेतु असावा हें उघड आहे.

क्रुश्चेव्ह यांच्या या नव्या पवित्र्याला आणखी एक महत्त्वाचें कारण आहे. आणि तें कम्युनिस्ट राष्ट्रगटांतील- विशेषतः रशियांतील- अंतर्गत घडामोडींत आहे. क्रुश्चेव्ह आज जरी रशियांतील सर्वोच्च हुकुमशहा असले तरी त्यांची सत्ता अजूनहि सर्वंकष अगर निरंकुश अशी नाहीं. त्यांनीं आज जें सर्वोच्च स्थान प्राप्त करून घेतलें आहे तें स्टॅलिनच्या (१९२३ ते १९२८ च्या दरम्यानच्या काळांतील) पावलांवर पाऊल टाकून. सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाचें सरचिटणीसपद काबीज करून त्यांनीं प्रथम पक्ष-संघटना संपूर्ण आपल्या नियंत्रणाखालीं आणली. कम्युनिस्ट हुकूमशाहींत सर्वत्र-राज्ययंत्रणेवरहि- पक्षाची दृढ पकड असल्यामुळें क्रुश्चेव्ह यांनीं पक्ष-यंत्रणेद्वारा सोव्हिएट राज्ययंत्रणाहि आपल्या ताब्यांत आणली. आज आपली सत्ता बळकट करण्याचा क्रुश्चेव्ह यांचा प्रयत्न चालू असला तरी अजूनहि त्यांना स्टॅलिनप्रमाणें सर्वंकष हुकूमशाही प्रस्थापित करण्यांत यश लाभलेलें नाहीं. याला अर्थात् कारणेंहि तशींच आहेत. १९५३ सालीं स्टॅलिनच्या मृत्यूनंतर निर्नायकी अवस्थेंत रशियांत गुप्त पोलीस खात्याचे अधिकार कमी करण्यांत आले. त्याचप्रमाणें लष्कराची सत्ताहि कमी करण्याचे उपाय अलीकडे योजले गेले आहेत. यामुळें आज रशियांत दहशत-यंत्रणा शिथिल झाली आहे. नागरीकांवरील हुकूमशाहीचें दडपणहि त्यामुळें पुष्कळच कमी झालें आहे. याचा परिणाम आज, तात्पुरती कां होईना, लोकमताची कदर हुकूमशाही नेतृत्वाला करावी लागत आहे. त्याचप्रमाणें पक्ष-संघटनेंतून व राज्ययंत्रणेतून क्रुश्चेव्ह यांनीं विरोधकांचें उच्चाटण केलें आहे. पण त्या विरोधकांचें अजून शिरकाण करण्यांत आलेलें नाहीं. आणि अधिकाराच्या जागांवर सर्वत्र क्रुश्चेव्ह यांनीं आपले हस्तक पेरले असले तरी हुकूमशाही यंत्रणेंत कृतज्ञतेच्या भरंवशावर कोणाताहि नेता आपलें सर्वोच्च आसन टिकवूं शकत नाहीं. सर्वंकष सत्तेचें कठोर तर्कशास्त्र हें अमानुष व सत्ता-स्पर्धेच्या नियमांनींच बद्ध असतें. त्यांत कृतज्ञतेला अगर मैत्रीला वाव नाहीं. त्यामुळें सर्व सत्ता-केंद्रें काबीज करूनहि क्रुश्चेव्ह यांना आज परिणामकारक दहशत-यंत्रणेच्या अभावीं, आपल्या साथीदारांच्या पाठिंब्यावरहि



अनुक्रमणिका






विसंबून रहातां येत नाहीं. त्यासाठीं त्यांना लोकमत व पक्ष–संघटना या दोघांचाहि पाठिंबा मिळवण्याची धडपड करावी लागत आहे. अविरत सत्ता–स्पर्धेत आपलें आसन टिकवण्यासाठीं त्यांना आपलें धोरण या दोनहि घटकांकडे नजर ठेवून आंखावें लागत आहे.

याचसाठीं क्रुश्चेव्ह यांनीं अधिकारावर आल्यावर शेतकरी वर्गाला सवलती दिल्या व अन्नधान्याचें उत्पादन वाढवण्याच्या महत्त्वाकांक्षी योजना हातांत घेतल्या. त्याचप्रमाणें शहरांतील जनतेला खूष करण्यासाठीं कामाचे तास कमी केले, कांहीं बाबतींत पगारवाढ केली व जीवनोपयोगी वस्तूंचा मुबलक पुरवठा करण्याचें भरघोस आश्वासन दिलें. याच्याच बरोबरीला त्यांनीं सप्तवार्षिक योजनाहि आंखली व हे सारे कार्यक्रम यशस्वी होण्यासाठीं सैन्यांतहि कपात केली. क्रुश्चेव्ह यांच्या या कार्यक्रमांमुळें सेनाधिकाऱ्यांचा रोष त्यांना ओढवून घ्यावा लागला. आणि त्यांच्या महत्त्वाकांक्षी योजनाहि व्हाव्या तितक्या यशस्वी होऊं शकल्या नाहींत. सोव्हिएट अर्थयोजनामध्यें वारंवार बदल करण्यांत येत आहे, हें त्या योजना पूर्ण करण्याच्या कामांत उद्भवणाऱ्या असंख्य अडचणींच्याच द्योतक आहेत. त्याचप्रमाणें अन्नधान्याचें उत्पादनहि अजून वाढूं शकलेलें नाहीं. या अंतर्गत अडचणींमुळें क्रुश्चेव्ह यांची हुकूमशाही अजूनहि दृढ होऊं शकलेली नाहीं. उलट त्यामुळें पक्ष-यंत्रणेंत असंतोष व विरोध वाढत आहे. आणि लोकानुनयापेक्षां पक्ष-यंत्रणेवर क्रुश्चेव्ह यांचें नेतृत्व जास्त अवलंबून असल्यामुळें त्यांच्या नेतृत्वाला खरा विरोध व स्पर्धा आहे ती पक्ष-संघटनेंतच. इथें त्यांना केवळ तथाकथित स्टॅलिनवाद्यांकडून विरोध संभवत नाहीं, तर लाल चीन वगैरे इतर कम्युनिस्ट राष्ट्रांतील पुढाऱ्यांकडूनहि त्यांना विरोध होत आहे. या विरोधाला यशस्वीपणें तोंड देण्यासाठीं आज क्रुश्चेव्ह यांना आंतरराष्ट्रीय राजकारणांत भरीव विजय मिळवून दाखवणें अत्यावश्यक बनलें आहे.

क्रुश्चेव्ह यांच्या कारकीर्दींत सोव्हिएट नेत्यांचें प्रधान लक्ष्य अंतर्गत घडामोडींकडून आंतरराष्ट्रीय राजकारणाकडे वळलें आहे, याचें कारण हेंच आहे. आंतरराष्ट्रीय घडामोडींना क्रुश्चेव्ह यांच्या अंमदानीत आज किती महत्त्व आलें आहे हें पहायचें झाल्यास क्रुश्चेव्ह यांच्या गेल्या वर्षभरांतील परराष्ट्र-वाऱ्यांकडे नजर फेकावी. गेल्या वर्षभरांत क्रुश्चेव्ह अंदाजें १०० दिवस रशियाबाहेर इतर देशांच्या वाऱ्या करीत होते. स्टॅलिन, युद्धकाळ सोडल्यास, कधींहि रशिया सोडून बाहेर गेला नाहीं. उलट क्रुश्चेव्ह यांना एका वर्षांत १०० दिवस इतर देशांत प्रवास करीत घालवावे लागले. हा फरक आज क्रुश्चेव्ह यांच्या नेतृत्वाचें उद्दिष्ट काय आहे हें स्पष्ट करतो. पण क्रुश्चेव्ह यांच्या परराष्ट्रीय धोरणाचेंहि अंतिम ध्येय स्टॅलिनवादीच आहे. स्टॅलिनचें जग जिंकण्याचें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं क्रुश्चेव्ह यांनीं स्टॅलिनच्याच धोरणाला लवचिक व वास्तववादी स्वरूप दिलें आहे. व त्याच उद्दिष्टाच्या प्राप्तीसाठीं ते आंतराष्ट्रीय राजकारणांत निरनिराळ्या धोरणांचे प्रयोग करून पहात आहेत. उदाहरणार्थ, १९५८ च्या नोव्हेंबर महिन्यांत क्रुश्चेव्ह यांनीं प्रथम बर्लिनबाबत धमकीची भाषा उच्चारली. व १९५९ च्या मे पर्यंत पाश्चात्य राष्ट्रांनीं तडजोड न केल्यास पूर्व जर्मनीशीं एकतर्फी करार करण्याची घोषणा केली. क्रुश्चेव्ह यांच्या या धमकीमुळें आंतरराष्ट्रीय राजकारण कांहीं काळ अत्यंत तंग बनलें. याचा परिणाम पाश्चात्य राष्ट्रांनीं बर्लिनप्रश्नावर खंबीर भूमिका घ्यायचें एकमतानें ठरवलें. लगेच कांहीं महिन्यांनीं क्रुश्चेव्ह यांनीं आपला पवित्रा बदलला व अमेरिकेशीं मैत्रीचे संबंध प्रस्थापित करण्याचें वरपांगी सोंग आणलें. याची परिणती गेल्या-वर्षी ऑक्टोबरमध्यें क्रुश्चेव्ह यांनीं अमेरिकेला आकस्मिक भेट देण्यांत झाली व कॅम्प डेव्हिडच्या मत्रीच्या वातावरणांत यावर्षी मे महिन्यांत पॅरिसला श्रेष्ठी-परिषद भरवण्याचा इरादाहि पक्का करण्यांत आला पण या सहजीवनाच्या अघळपघळ भाषेनेंहि बर्लिनचा प्रश्न क्रुश्चेव्ह यांच्या मनाप्रमाणें सुटण्याचीं चिह्नें दिसेनात. उलट पाश्चात्य राष्ट्रांमधील मतभेद मिटवण्यांत येऊन बर्लिनबाबतची खंबीर भूमिका कायमहि करण्यांत आली, म्हणजे श्रेष्ठी परिषदेची फलश्रुति शून्य ठरणार हें आधींच उघड झालें. श्रेष्ठी परिषदेची फलश्रुति शून्य ठरणें हा क्रुश्चेव्ह यांच्या धोरणाचा पराभव ठरला असता. याचा परिणाम म्हणजे रशियानें पुन्हां ताठर धोरण स्वीकारलें व मे महिन्यांत पॅरिस येथील श्रेष्ठी परिषद उधळून लावण्यांत आली. क्रुश्चेव्ह यांच्या धोरणाचा लंबक लगेच दुसऱ्या टोकाला पोंचला व



अनुक्रमणिका






अमेरिकेविरोधी आक्रमक व आक्रस्ताळे पवित्रे घेण्यास सुरुवात झाली.

क्रुश्चेव्ह यांच्या परराष्ट्रीय धोरणाच्या पराजयाचा परिणाम त्यांच्या नेतृत्वाला सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षांतील स्टॅलिनवाद्यांचा व लाल चीनमधील राज्यकर्त्यांचा असलेला विरोध वाढण्यांत होणें अपरिहार्य आहे. या विरोधकांच्या शिडांतील वारा काढून घेण्यासाठींच क्रुश्चेव्ह यांना ताठर भूमिका घ्यावी लागली आहे. अजूनहि त्यांच्या परराष्ट्रीय धोरणाला भरघोस यश लाभण्याचीं चिन्हें नाहींत. पण आतां केनेडी यांच्या विजयामुळें वॉशिंग्टनमध्यें खांदेपालट होत आहे. त्यामुळें पुन्हां श्रेष्ठी-परिषदेचें व सहजीवनाचें आमिष दाखवून व आंतरराष्ट्रीय प्रचारमोहीमेनें अमेरिकन नेत्यांवर जागतिक लोकमताचें दडपण आणून बर्लिनची कोंडी, निःशस्त्रीकरण करार अगर अणुस्फोट बंदी वगैरे प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न रशिया करील, पण या प्रश्नांवरील–विशेषतः बर्लिनच्या प्रश्नावरील– पाश्चात्य व कम्युनिस्ट राष्ट्रें यांच्या भूमिकेंतील मतभेद इतके मूलभूत आहेत कीं ते निव्वळ श्रेष्ठी परिषदेनें सुटणें शक्य नाहींत. रशियानें आपलें मूलभूत हुकुमशाहीप्रसाराचें धोरण सोडून दिल्याखेरीज या प्रश्नांवर समाधानकारक तडजोड होणें दुरापास्तच आहे. निःशस्त्रीकरणकरार व अण्वस्त्रस्फोटांवरील बंदी या प्रश्नांवर मात्र तडजोड होण्याची एकवेळ शक्यता आहे. पण त्यासाठीं रशियाला परिणामकारक आंतरराष्ट्रीय नियंत्रण व देखरेख यांना मान्यता द्यावी लागेल. बर्लिनची कोंडी मात्र सुटणें सध्यांतरी अशक्य आहे.

---











अनुक्रमणिका

प्रा. ग. प्र. प्रधान

# टॉल्स्टॉयचा साहित्य-संसार

[ काउंटलिओ टॉलस्टाय यांची ५० वी पुण्यतिथि २०।११।६० ला केवळ रशियांतच नव्हे तर इतर अनेक देशांत साहित्यकार व मानवतावादी यांनी साजरी केली. भारतांतहि अनेक शहरांत साजरी झाली, त्या निमित्तानें हा लेख लिहिला आहे. ]

श्रेष्ठ कलावंत हा सौंदर्यनिर्मितींत इतका गुंतलेला असतो कीं जग सुधारण्याच्या खटाटोपाकडे त्याचें सहसा लक्षच जात नाहीं. कांहीं कलावंताची अशी भूमिका असते कीं सौंदर्याच्या दर्शनानें जगाच्या मनावर जो संस्कार घडतो तो शिव असतोच निदान शिवास उपकारक ठरतो. त्यामुळें स्वतंत्रपणें विचार मांडण्याची त्यांना आवश्यकता वाटत नाहीं. यापेक्षां वेगळी वृत्ति असणाऱ्या एखाद्या कलावंतानें आग्रहानें कांहीं विचार मांडले की त्याच्यावर मोठा गहजब होतो. बरेच विचारवंत आपल्या उच्चभ्र भूमिकेवरून " कलावंताच्या अव्यवहारी विचारांकडे लक्ष देण्याचें कारण काय ? " असा त्याचा उपहास करतात व साहित्याचे टीकाकार, विचारांच्या मार्गे लागून कलेस हीनपणा आणल्याबद्दल त्या कलावंताला दोष देतात. लिओ-टॉल्स्टॉय या जगप्रसिद्ध लेखकाच्या बाबतींत हें दुधारी टीकेचें शस्त्र अनेकांनीं वापरलेलें आहे.

टॉल्स्टॉयच्या ' वॉर अँड पीस, ' ' ॲना कॅरीनीना, ' ' रिसेरक्शन ' या तीन कादंबऱ्या, ' कोझॅक्स ' ' सेव्हॅस्टोपोल ' व अन्य लष्करी जीवनाचें चित्रण करणाऱ्या कथा, आणि ' डेथ् ऑफ् आयव्हॅन इलिच ' ही दीर्घकथा –या व अन्य कलाकृतींची अत्यंत चोखंदळ टीकाकारांनींहि मुक्तकंठानें स्तुति केली आहे. सॉमरसेट् मॉम व टॉल्स्टॉय या दोघांच्या जीवनविषयक व कलाविषयक दृष्टिकोनांत यत्किंचितहि साम्य नाहीं. पण तरीहि मॉमनें ' अभिजात लेखक ' म्हणून टॉल्स्टॉयचा गौरव केलेला आहे. टर्जिनेव्ह हा टॉल्स्टॉयचा समकालीन लेखक होता व या दोन कलावंतांत अतिशय तीव्र मतभेद झालेले होते. टर्जिनेव्हची निर्भेळ कलावंताची भूमिका टॉल्स्टॉयला मान्य नव्हती व टॉल्स्टॉयचा जीवनदृष्टिविषयक आग्रह टर्जिनेव्हला हास्यास्पद वाटत होता. पण असें असूनहि टॉल्स्टॉयच्या कथनशैलीबद्दल व स्वभावलेखनाबद्दल टर्जिनेव्हला नितांत आदर होता व टॉल्स्टॉयनें अधिक वाङ्मयनिर्मिती करावी असें त्यानें कळकळीनें विनविलें होतें. पण या सर्व टीकाकारांच्या मतें टॉल्स्टॉयनें आपल्या प्रतिभेचा संपूर्ण आविष्कार करण्याऐवजीं, आपलें लेखनसामर्थ्य तत्त्वप्रचारासाठीं वापरून स्वतःवर व जगावर मोठा अन्याय केला आहे. एका टीकाकारानें तर टॉल्स्टॉयचें वाङ्मयीन जीवन ही एक शोकान्तिका आहे असें उद्गार काढले आहेत.

या प्रश्नाचा विचार करतांना टॉल्स्टॉयचें व्यक्तिजीवन आणि वाङ्मयीन जीवन यांचा परस्पर संबंध कोणत्या प्रकारचा होता हें प्रथम जाणून घेतलें पाहिजे. त्यानंतर टॉल्स्टॉयच्या कलाविषयक मतांचा त्यांच्या कलाकृतींच्यावर कोणता परिणाम झाला होता हें पाहिलें पाहिजे व अखेर टॉल्स्टॉयचा तत्व-विषयक अभिनिवेश हा त्याच्या कलाजीवनास मारक ठरला कीं या अभिनिवेशामागची त्याची आंतरिक तळमळ ही त्याच्या कलेस उपकारक ठरली या प्रश्नाचें उत्तर शोधलें पाहिजे.

टॉल्स्टॉय हा कमालीचा आत्मनिष्ठ लेखक होता. जीवन तो उत्कटतेनें जगला. आणि या जीवनाचे पडसाद त्याच्या साहित्यांत ठायीं ठायीं उमटले. जीवनाची जी अनुभूति त्याला आली, ज्या घटनांनीं त्याच्या मनावर परिणाम झाला, ज्या व्यक्ति त्याला अविस्मरणीय वाटल्या– त्या सर्वांचें चित्रण त्यानें आपल्या साहित्यांत केलेलें आहे. कल्पनेचें विश्व निर्माण करून त्यांत केवळ रमून जावयाचें– हें टॉल्स्टॉयनें कधींच केलें नाहीं. याचें कारण सर्वसामान्य जीवनांतील सुखदुःखाच्या

छटा, साध्यासुध्या माणसांच्या जीवनांतील रसरशीतपणा, निसर्गाच्या सुपरिचित दृश्यांतील सौंदर्य— या सर्वांतील काव्य टॉल्स्टॉयला उत्कटतेनें प्रत्ययास आलें होतें व त्यामुळें वास्तवापासून त्याचें साहित्य कधीं दुरावलें नाहीं अर्थात् टॉल्स्टॉय हा कलावंत असल्यामुळें त्यानें आपल्या अनुभूतीचें केवळ यथातथ्य चित्रण केलेलें नाहीं, वास्तवाचा योग्य तो उपयोग त्यानें आपल्या कलाकृतींत केला व त्यामुळें त्या कृतींतील जीवनाचें दर्शन उठावदार होऊन त्या कृतींच्या सौंदर्यांत भर पडली.

टॉल्स्टॉयनें आपल्या अनेक व्यक्तिरेखांतून आत्म-प्रकटीकरण केलेलें आहे. 'कोझॅक्स' मधील ओलेनिन, 'लँड ओनर' मधील नेखुडॉव्ह, 'ॲना कॅरीनिनां-तील' लेव्हिन व वॉर अँड पीस मधील' बेझुकॉव्ह या चार व्यक्तिरेखांत टॉल्स्टॉयच्या स्वभावाच्या छटा स्पष्टपणें जाणवतात. त्याच प्रमाणें 'वॉर अँड् पीस' मधील धाकट्या रोस्टोफचें टॉल्स्टॉयच्या वडिलांशीं साम्य आहे व सोनिआची व्यक्तिरेखा टॉल्स्टॉयच्या मावशीच्या व्यक्तिमत्वाशीं जुळणारी आहे. रिसरेक्शन मधील नेखुडॉव्ह हा वेश्येशीं लग्न करावयास तयार होतो या घटनेचा, टॉल्स्टॉयचा भाऊ डिमिट्री यांनें वेश्येशीं लग्न केलें होतें या घटनेशीं असलेला संबंध उघड आहे. ॲना कॅरिनीना मधील लेव्हिनच्या भावा-च्या मृत्यूचें वर्णन हें टॉल्स्टॉयनें आपल्या थोरल्या भावाच्या मृत्यूच्या प्रसंगावरून केलेलें आहे. टॉल्स्टॉयनें सैन्यांत नोकरी करीत असतांना कॅकेशस् विभागांत जे अनुभव घेतले व क्रीमिअन युद्धांत त्याला जे अनुभव आले, त्यामधूनच 'रेड' 'कोझॅक्स' व 'सेव्हॅस्टोपोल वार स्केचेस्' लिहिलेलीं आहेत. 'चाइल्डहूड' हें पुस्तक तर उघडउघड आत्मकथ-नात्मक स्वरुपाचें आहे व त्यावरून टॉल्स्टॉयचें बालपण कोणत्या वातावरणांत गेलें, त्याला उपेक्षितांबद्दल कशी आत्मीयता वाटत असे, तेरा चौदाव्या वर्षीं त्याच्या मनाला धर्मकल्पनेबद्दल कसें आकर्षण वाटे, आणि लहानपणापासून तो व्यक्तिवादी कसा होता या गोष्टींची संपूर्ण कल्पना येऊं शकते. वरील कांहीं उदाहरणांवरून टॉल्स्टॉयच्या साहित्यांत आत्मचित्रीकरण हा एक अतिशय महत्त्वाचा भाग कसा आहे तें समजून येईल.

टॉल्स्टॉयच्या स्वभावांत विकारवशता आणि विकारी जीवनाबद्दल तिटकारा, धर्मपरायणता आणि धर्मपंथां बद्दलची उबग, कमालीची आत्मनिष्ठा आणि समा-जांतील सर्वसामान्य माणसाबद्दल वाटणारी आपुलकी अशा विविध प्रवृत्ति होत्या. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याच्या मनांत कोणतीहि विकृति नव्हती आणि विकृत मनाच्या माणसांच्या मनाचें विश्लेषण करण्यांत त्याला कधींच फारसा रस वाटला नाहीं. यास्नाया पोल्याना या आपल्या गांवीं टॉल्स्टॉयच्या आयुष्यांतील खूप काळ गेला. आणि विद्यार्थीदशेंत व सैन्यांत नोकरी करतांना तो जरी अतिरेकी पद्धतीचें जीवन जगला तरी शहरी वातावरणांत त्याचें मन कधींच रमलें नाहीं. पीटर्स बर्ग मधील लेखकांनीं व टीकाकारांनीं त्याच्या लिखाणाचें कौतुक केलें व त्याच्या संबंधीं मोठा आदर दाखविला पण टॉल्स्टॉयला मात्र या बुद्धिवाद्यांच्या बद्दल मुळींच आपुलकी वाटली नाहीं. तो खऱ्या अर्थानें भूमीपुत्र ( son of the soil ) होता आणि मोकळया हवेंतील निरोगी, रांगड्या जीवनाबद्दल त्याच्या मनाला मोठें आकर्षण होतें. शहरांतील समस्या कृत्रीम आहेत असें त्याला वाटे व तेथील लोकांच्या जीवनाचा उबक म्हणून तो उपहास करी. याचा परिणाम त्याच्या साहित्यावर अपरिहार्यपणें झालेला आहे. पण महत्त्वाची गोष्ट ही कीं त्याच्या मनांतील ही खूणगाठ इतरांना पटावी यासाठीं मात्र त्यानें साहित्य निर्माण केलें नाहीं. ज्या व्यक्ति त्याला विलोभनीय वाटल्या, त्यांच्या प्रतिकृति त्यानें निर्माण केल्या. ज्या प्रवृत्तींनीं त्याच्या मनाला आकृष्ट केलें त्यांचे पडसाद त्याच्या साहित्यांत उमटले. प्रत्येक थोर लेखकाच्या बाबतींत हेंच होतें. टॉल्स्टायने, कृषीवल जीवनांत निरोगी प्रवृत्ति अनेकदां वाढतात आणि निसर्गाशीं झुंज खेळतांना निसर्गावर प्रेम करूं लागणारीं माणसें सर्व जगावर प्रेम करूं लागतात, असें पाहिलें होतें व अनुभविलेंहि होतें. या त्याच्या अनुभूतीतूनच वॉर अँड पीस मधील प्लेटन कारातायफ् ही अमर व्यक्तिरेखा निर्माण झाली आहे. हा शेतकरी-सैनिक हुशार नसतो अगर रुबाबदारहि नसतो. पण तो सर्वांवर प्रेम करतो. फ्रेंच सैन्य ज्यावेळीं मॉस्कोहून माघार घेत असतें. त्यावेळीं युद्धकैदी म्हणून त्याचीहि फरपट चालू असते. पण या सर्व









अनुक्रमणिका

यातना भोगतांनाहि त्याचें मन इतरांविषयीं प्रेमानें तुडुंब भरलेलें होतें, गोड शब्द, प्रसन्न हास्य, लहान सहान बाबतींत करावयाची मदत यातून तो इतरांच्या कष्टमय जीवनांतील दुःख कमी करण्याचा प्रयत्न करीत होता. पुढें इतरांच्या बरोबर त्याच्यानें चालवेना म्हणून त्याला गोळी घालून ठार करण्यांत येतें. त्या-वेळीं दोघा फ्रेंच सैनिकांच्या मुद्रेवरील अपराधित्वाचा भाव आणि प्लेटनच्या कुत्र्याचें रडणें याचा उल्लेख करून टाल्स्टॉयनें प्लेटनच्या जीवनाचा आणि मृत्यूचा पिअरे-( वॉर अँड पीस या कादंबरीतील एक प्रमुख व्यक्तिरेखा ) वर परिणाम कसा होतो हें दाखविलें आहे. युद्धांत जी हत्या होते त्यासंबंधीं टॉल्स्टॉयला अतिशय चीड येई व अनेक निरपराध व चांगलीं माणसें मारलीं गेललीं पाहून तर त्याच्या मनाला फार वेदना होत. पण हें प्रचारकी अभिनिवेशानें त्यानें येथें सांगितलें नाहीं. अत्यंत कलापूर्ण स्वभावचित्र निर्माण करून त्यानें इष्ट तो परिणाम साधला आहे.

टॉल्स्टॉयनें आपल्या लेखनाला सुरवात करतांना कोणताहि हेतु मनाशीं ठेवला नव्हता. साहित्य-निर्मिति हा त्याच्या जीवनाचा अविभाज्य घटक होता. रोज-निशी लिहावयाला त्यानें विद्यार्थीदशेंतच सुरवात केली. रोजनिशींत, ज्या घटना घडल्या त्या केवळ नमूद न करतां कोणत्याहि प्रसंगांत अगर कृतींत आपल्या मनांत कोणते भावतरंग निर्माण झाले, कोणत्या विकारांचें वादळ उठलें, कोणते उदात्त विचार स्फुरले या सर्व गोष्टी तो विस्तारानें लिहीत असे. कित्येकदां नुसत्याच विचारांचें अगर भावनांचें प्रगटी-करण करण्यासाठीं तो लिही. या त्याच्या संवयीतूनच त्याचें मानवी जीवनविषयक चिंतन वाढत गेलें आणि यामुळेंच पुढे लेखन करतांना मानवी मनाचा गोफ उकलून दाखविणें त्याला सहज शक्य झालें. पण त्याची साहित्यनिर्मिती सुरवातीस हेतुपूर्ण नव्हती हें खरें असलें तरी काय लिहावयाचें यासंबंधीं त्याच्या मनांत सुस्पष्ट कल्पना असे. वॉर अँड पीस ही कादंबरी लिहिण्यापूर्वी एका महत्वाच्या ऐतिहासिक कालखंडांत रशियांतील जीवनांत कसें आवर्त निर्माण झालें, या युद्धामुळें कांही कुटुंबाच्या व विशेषतः त्यांतील कांहीं व्यक्तींच्या जीवनावर कसे परिणाम झाले व जीवनप्रवाह खंडित झालेला [illegible] तरी तो अविरत चालू कसा राहिला हें सर्व दाखवावयाचें आहे याची टॉल्स्टॉयला पूर्ण कल्पना होती. हें गद्य-महाकाव्य लिहिण्यापूर्वी तो अनेक वर्षे त्या काल-खंडाचा अभ्यास करीत होता. म्हणजे साहित्य निर्मिति हा केवळ एक सहजस्फूर्त आविष्कार आहे ही टॉल्स्टॉ-यची कल्पना नव्हती. सौंदर्य-निर्मिति करण्याची सहज प्रेरणा त्याच्या मनांत प्रबल झाल्यावर, या प्रेर-णेचा आविष्कार करण्यापूर्वी तो अतिशय परिश्रम घेत असे. मूळच्या अत्यंत सामर्थ्यवान प्रतिभेला या चिंतनशील परिश्रमांची जोड मिळाल्यामुळेंच तो वॉर अँड पीस, अॅना कॅरिनीना अशा भव्य आणि सुंदर कलाकृति निर्माण करूं शकला. पण टॉल्स्टॉ-यच्या मनाची अशी एक घडण होती कीं कांहींहि केलें कीं, 'हें आपण कां केलें?' हा प्रश्न, तो स्वतःच्या मनाला विचारी. 'वॉर अँड पीस' ज्या कालखंडांत त्यानें लिहिलें त्यावेळीं या प्रश्नानें तो फारसा अस्वस्थ झाला नव्हता. पण पुढे आयुष्यांतील या सर्व घडपडीचा अर्थ शोधण्याच्या कल्पनेनें त्याला पछाडलें आणि ज्या सृजनशील प्रतिभेच्या आविष्का-रांत त्याला अपूर्व आनंद लाभला तो आविष्कार करणें हा एक प्रकारचा स्वार्थच आहे असे विचार त्यानें व्यक्त केले. टॉल्स्टॉयला सर्व जीवनासंबंधींच असमाधान वाटूं लागलें व १८८० ते ८५ या काल-खंडांत त्यानें My Confession, The Four Gospels, My Religion हीं पुस्तकें लिहिलीं. आणि १८९९ सालीं What is Art हें जें पुस्तक त्यानें लिहिलें त्यांतहि हीच मनोभूमिका कायम आहे. कलेविषयींच्या या पुस्तकांत दोन परस्पर-विरोधी प्रवृत्तींचें द्वंद्व स्पष्ट दिसून येतें. अभिनिवेशानें विचार करणारा टॉल्स्टॉय स्वतःच्या कलानिर्मितीकडे परकेपणानें कांहींसा दुराग्यानें पाहतो व ही आपण केलेली धडपड त्याला निष्फळ वाटते. पण सत्यकथन ही प्रवृत्तीहि टॉल्स्टॉयच्या मनांत तितकीच तीव्र असल्यामुळें कलेनें मानवी जीवनांत जो निरागस आनंद निर्माण होतो त्याचाहि त्याला विसर पडूं शकत नाहीं, व तो कलेचें मोठेपण मान्य करतो.

टॉल्स्टॉयनें कलेची व्याख्या करतांना आपली भूमिका स्पष्ट केली आहे. कलेची व्याख्या केवळ सौंदर्यशास्त्राचा आधार घेऊन करतां येणार नाहीं असें त्याचें [illegible] होतें.








त्याच प्रमाणें सुख हें कलेचें उद्दिष्ट आहे ही कल्पना विसरून गेली पाहिजे व मानवजातींतील परस्पर-स्पर्शाचें एक महान् व प्रभावशाली साधन म्हणून कलेचा विचार केला पाहिजे ही त्याची भूमिका होती. कलेची स्वतःची व्याख्या सांगतांना तो म्हणतो, "कला हा एक मानवी व्यापार आहे. स्वतःला ज्या भावनांचा अनुभव आला, त्या भावना स्वतःमध्ये पुन्हा जागृत करून, मग रेखा, रंग, लय, सूर, शब्द, हावभाव इत्यादि साधनांच्या द्वारा दुसऱ्यांनाहि तो तितकाच उत्कट असा अनुभव आणून देणें हें कलेचें कार्य आहे." कलावंताची भावना जितकी उत्कट असेल व तिचा आविष्कार जितका सुस्पष्ट असेल त्यावर कलेची परिणामकारकता अवलंबून असते हा विचार टॉलस्टॉयनें मांडला आहे. श्रेष्ठ कलेमुळें मानवाच्या मनांत उदात्त भावनांचा उद्भव झाला पाहिजे ही त्याची अपेक्षा आहे. कला म्हणजे काय ? या प्रश्नाचा विचार करतांना टॉल्स्टॉयनें मूठभर श्रीमंत लोकांना रिझविणाऱ्या व वरिष्ठ वर्गांतील व्यक्तींच्या भावना – विकारांचें अवास्तव अवडंबर माजविणाऱ्या कलेचा अत्यंत कठोर उपहास केला आहे. पण दुर्दैवानें या विवेचनाच्या ओघांत त्यानें ग्रीक नाटककार, डांटे, गटे या थोर साहित्यिकांच्या-वर फार अन्याय केला आहे. शेक्सपिअर वरील व विशेषतः किंग लिअर या शोकांतिकेवरील त्याची टीकाहि अगदीं चुकीची आहे. कलेंतील सत् व असत् यावरील त्याचें विवेचन व कला श्रेष्ठ नीति-कल्पनांचा आविष्कार करून मानवाला खऱ्या धर्माचा मार्ग दाखविते हें टॉल्स्टॉयचें म्हणणें अत्यंत विवाद्य आहे. पण त्याच्या विवेचनांत हे ठळक दोष ज्या प्रमाणें आहेत त्याचप्रमाणें कलेसंबंधीं त्यानें मांडलेले कांहीं विचार अतिशय मौलिक आहेत. धंदेवाईक कृत्रिम कलेवर त्यानें कठोर टीका केली असून, कला ही कोणास हुकुमानें निर्माण करतां येणार नाहीं. पैशाच्या तालावर कधीं नाचणार नाहीं हा विचार मांडतांना मानवी जीवनांत कलेला स्वतंत्र अस्तित्व असलें पाहिजे ही आकांक्षा त्यानें व्यक्त केली आहे. तंत्राचें अवडंबर, दुर्बोधता या दोषांवर त्यानें बरोबर बोट ठेवलें असून सहजता सहलता, आणि सुस्पष्टता हे कलेला आवश्यक असे गुण आहेत हें आग्रहानें प्रतिपादिलें आहे. कला ही मूठभर लोकांसाठीं असूं शकणार नाहीं, स्थलकालाच्या मर्यादा ओलांडून तिचा स्पर्श सर्वांना होईल, कलेमुळें मानवजातीला एकतेचा साक्षात्कार होईल हे विचार मांडून टॉल्स्टॉयनें कलेचें महत्त्व मान्य केलें आहे. शेवटीं टॉल्स्टॉयनें ज्यांना जीवन हें सुंदर, आनंदमय आणि उदात्त वाटत असेल तेच कला निर्माण करूं शकतील असा विश्वास टॉल्स्टॉयनें व्यक्त केला आहे.

टॉल्स्टॉयच्या कलाविषयक मतांत कांहीं परस्पर-विरोधी मतें आहेत व त्याचीं अनेक मतें न पटण्या-सारखीं आहेत हें खरें पण या मतांचा त्याच्या साहित्यावर काय परिणाम झाला हें पाहिलें पाहिजे. कलेनें जीवनाला उदात्त वळण लावलें पाहिजे हा वैचारिक अभिनिवेश निर्माण झाल्यानंतर त्यानें वॉर अँड पीस, ॲना कॅरिनीना यासारख्या कलाकृति निर्माण केल्या नाहींत हें खरें. पण उघड उघड नीतिकथा म्हणून लिहिलेल्या त्याच्या कथांपैकीं अनेक कथा, 'कथा' म्हणून प्रभावी आहेत आणि या कथांत वावरणारीं माणसें आणि त्यांचीं सुखदुःखें वास्तवपूर्ण आहेत. How much land does a man need हें तात्पर्य असलें तरी त्यांत रेखाटलेला पॅहोम हा शेतकरी वास्तव सृष्टींतील आहे. अनेक वर्षें काबाड-कष्ट केल्यानंतर त्याच्या मनांत निर्माण झालेली सुखोप-भोगाची इच्छा, त्याचें जमिनीवरील प्रेम, आपण जमिनी-तून सोनें पिकवूं शकूं हा त्याचा आत्मविश्वास, किफाय-तशीर सौदा केला या भावनेनें त्याला वाटलेला अहंकार, ईर्षेच्या आहारीं जातांना होणारी त्याच्या मनाची स्थिती - या सर्व छटांमुळें ही गोष्ट प्रभावी वाटते. या गोष्टीला तात्पर्य असलें तरी या कथेचा नायक हें लेख-काच्या हातचें बाहुलें नाहीं, तो टॉल्स्टॉयची भाषा बोलत नाहीं स्वतःची भाषा बोलतो या गोष्टी नाका-रणें योग्य होणार नाहीं. What Men Live By या कथेंतील सेम्यॉं या मोच्याचें जीवन, त्याच्या खड-तर जीवनांतील आशा-निराशा, हाल अपेष्टांमुळें कठोर झालेली त्याची बायको, आणि त्याच्या जीवनांत अन-पेक्षितपणें आलेला एक भणंग भिकारी या सर्व गोष्टी टॉल्स्टॉयनें अगदीं सरळपणें सांगितल्या आहेत आणि तरीहि ही गोष्ट कंटाळवाणी झालेली नाहीं. गोष्टीच्या शेवटीं देवदूतानें केलेलें भाष्य उघड नीतिपर आहे



अनुक्रमणिका








पण निरीश्वरवादी वाचकालाहि या गरीब माणसाच्या मनांतील उदात्ततेचें दर्शन हृद्य वाटतें. क्रुट्झर सोनेटा ही लघु कांदबरी टॉल्स्टॉयच्या अन्य कादंबऱ्याहून वेगळी आहे. द्वेष आणि तिटकारा या भावनांचें चित्रण स्टिंडबर्गच्या पद्धतीनें करून टॉल्स्टॉयनें आपल्या कलानिर्मितीच्या सामर्थ्याचा एका वेगळ्याच तऱ्हेनें प्रत्यय आणून दिला आहे. त्याच्या कलाविषयक मतें या कलाकृतींला मुळींच विघातक ठरलीं नाहींत. 'रिसरेक्शन' ही टॉल्स्टॉयची शेवटची कादंबरी. ही कादंबरी उघड उघड हेतुपूर्ण आहे आणि तरीहि कलादृष्ट्या ती हिणकस झालेली नाहीं. नेखुडॉव्ह या नायकाच्या पूर्वायुष्यांतील प्रेमकथा, नंतरची त्याच्या जीवनाला मिळालेली कलाटणी, काटुशाच्या अधःपाताला आपण कारणीभूत झालों आहोंत हें समजल्यावर त्याच्या मनाची झालेली तडफड, तिला मदत करण्याची त्याची धडपड, तिचा नैतिक अधःपात पाहून त्याला वाटलेला विषाद, त्यांतून स्वतःच्या अपराधाच्या भयंकरपणाची आलेली कल्पना, तिच्याबरोबर त्याचें सैबेरियास जाणें, काटुशानें केलेला त्याच्या प्रेमाचा अव्हेर आणि तिच्या सुखांत समाधान मानण्याची त्याची तयारी-या सर्वांतून एक अत्यंत कारुण्यपूर्ण व मनाला चटका लावणारी कथा टॉल्स्टॉयनें सांगितली आहे. या कथेंतील वेश्येवर टॉल्स्टॉयनें सद्गुण लादले नाहींत. परिस्थितीनें तिचा अधःपात झाल्यावर दुर्दैवानें तिला प्रथम नेखुडाव्हचा निःस्वार्थीपणा समजत नाहीं. पण आयुष्यांतील नरक यातना भोगतांनाच तिच्या मनाची ही भ्रष्ट अवस्था कमी होते व सरळ जीवन जगण्याची आकांक्षा तिच्यांत निर्माण होते. कोर्टाचें वातावरण व तुरुंगांतील जीवन यांचीं वर्णनें अतिशय बहारीचीं आहेत. नेखुडाव्हच्या जीवनाचें पुनरुत्थान दाखवितांना टॉल्स्टॉयनें अकारण हळवेपणा दाखविलेला नाहीं. सद्गुणांवर प्रवचनें झोडलीं नाहींत. कादंबरींतील एकाहि पात्राचा कळसूत्री बाहुल्याप्रमाणें उपयोग केलेला नाहीं. वातावरण १०० टक्के वास्तववादी आहे. मनाच्या सूक्ष्म व्यापारांचें विलक्षण बारकाव्यानें वर्णन केलेलें आहे. घटनांत उथळ नाटकीपणा नाहीं. निवेदन सरळ, अत्रुटित आहे. आणि या सर्वांमुळें वाचकाला जीवनाच्या वेगळयांच पातळीवर नेण्याचें सामर्थ्य या कादंबरींत आलें आहे.

एक गोष्ट येथें मात्र मान्य केली पाहिजे कीं 'रिसरेक्शन' ही कादंबरी हृदयस्पर्शी असली तरी 'वॉर अँड् पीस' व 'अॅना कॅरिनीना' या कादंबऱ्यांच्या मानानें तिच्यांत कलागुण कमी आहेत. तुलनेनें कदाचित् ही गोष्ट अधिक स्पष्ट होऊं शकेल. माणसानें दुःख भोगल्यानें त्याच्या मनावरचें दडपण कमी होतें व त्यांतच अखेर त्याला मुक्तीचा मार्ग सांपडतो ( Redemption through suffering ) ही एक टॉल्स्टॉयची आवडती कल्पना आहे. वॉर अँड पीस मधील पिअरे हा पूर्वायुष्यांत भोगलोलुप असतो. इतरांबद्दल त्याला सहानुभूति वाटते पण तरीहि त्याच्या जीवनांत असमाधान दाटून राहिलेलें असतें. पण फ्रेंचांनीं सैनिक म्हणून कैद केल्यावर ज्या अपेष्टा त्याला सहन कराव्या लागतात, प्लेटनच्या जीवनांतील सहनशीलता व प्रेममयता जेव्हां तो पहातो तेव्हां त्याच्या दृष्टिकोनांत फरक होतो. त्याला आपल्या हालांचें कांहीं वाटत नाहीं. किंबहुना दुःख नसेल तर उदात्त जीवन जगावेसेंच वाटणार नाहीं अशी त्याची खात्री पटते. हें सर्व टॉल्स्टॉयनें अत्यंत कलात्मक रीतीनें मांडलें आहे. त्या मानानें नेखुडाव्ह व काटुशा यांना सोसावें लागणारें दुःख व त्यांतून झालेलें त्यांच्या मनाचें उन्नयन हें वाचतांना टॉल्स्टॉयच्या हेतूची, व Redemption through suffering या सिद्धांतांच्या समर्थनाची सारखी जाणीव होते. वॉर अँड पीस मधील हेतुगर्भतेची जागा रिसरेक्शनमध्ये हेतुपूर्णतेनें घेतली आहे आणि येथें कलादृष्ट्या तो पूर्वीच्या अत्युच्च पातळीवर जाऊं शकत नाहीं.

मला असें वाटतें कीं टॉल्स्टॉयचे बोधवादी विचार अनेकांना मान्य होणार नाहींत. पण कलेवर हे विचार लादून सौंदर्याचा अपकर्ष करण्याची बर्नार्ड शॉनें अनेकदां केलेली चूक टॉल्स्टायनें केली नाहीं हें त्याच्या टीकाकारांना मान्य करावें लागेल. त्याला जें सांगावयाचें असतें तें तो उघडपणें सांगतो. बोधकथा लिहितांना बोध करावयाचे हें तो लपवित नाहीं. पण जीवनाचें चित्र रंगवितांना तो कधीं सत्याचा अपलाप करीत नाहीं. त्याच्या कथा-कादंबऱ्यांतील माणसें केवळ चांगलीं नसतात आणि केवळ वाईटहि नसतात. तीं माणसें असतात आणि विशिष्ट परिस्थितींत त्यांच्या मनाच्या काय प्रतिक्रिया होतील हें टॉल्स्टॉय अचूक-



अनुक्रमणिका






पणें जाणतो. अमूर्त तत्वांचें माध्यम म्हणून टॉल्स्टॉय त्यांना कधीं वापरीत नाहीं. हीं माणसें आपल्या सर्वां-प्रमाणेंच बदलतात पण त्यांच्यातील परिवर्तन हें लेख-कानें निर्माण केलेलें नसून परिस्थिति व त्यांच्या सहज-प्रेरणा यांच्या परस्पर परिणामांतून तें अपरिहार्यपणें निर्माण होतें. वॉर अँड पीस मधील आन्द्री मर्दुमकी गाजवतो, जबर जखमी होतो. जखमी होतांनाहि हातांतील झेंडा सोडत नाहीं, व अर्धवट शुद्धीवर आल्यावर भोंवतालच्या संग्रामाकडे पाहण्यासाठीं डोळे उघडतो आणि त्याच्या नजरेस विस्तीर्ण आकाश पडतें. त्याक्षणीं मानवी जीवनांतील कलहाची विफलता आणि जीवनाचें चिरंतनत्व याची त्याला एकदम कल्पना येते. या अनुभवामुळें त्याची दृष्टीच बदलते. आन्द्रीच्या मनां-तील टॉल्स्टॉयनें दाखविलेलें परिवर्तन प्रत्येक वाचकाच्या मनाला स्पर्श करतें; या परिवर्तनांतील अपरिहार्यता आपल्याला जाणवते आणि टॉल्स्टॉयनें जीवनांतील सत्याचें पावित्र्य मानल्यामुळें त्याची कला श्रेष्ठ कशी राहिली हें स्पष्टपणें ध्यानांत येतें.

मला असें वाटतें कीं टॉल्स्टॉयच्या वैयक्तिक जीव-नांत तो आपल्या तत्त्वांचें पालन पूर्णपणें करूं शकला नाहीं यामुळें त्याला आपलें जीवन अपयशी झालें असें वाटलें. त्याच्या पत्नीशीं आणि कांहीं मुलांशीं त्याचे मतभेद झाले व अखेर त्याने गृहत्याग केला. त्याच्या मनाला अखेरपर्यंत शांतता मिळूं शकली नाहीं. या सर्व गोष्टींमुळें कांहीं टीकाकारांना असें वाटतें कीं टॉल्स्टॉयचें जीवन ही एक शोकान्तिका आहे. या बाबतहि मतभेद होऊं शकेल. कारण संवे-दनाशील माणसाच्या मनांतील अस्वस्थता ही व्यव-हारवादी माणसाच्या समाधानापेक्षां मला श्रेष्ठ वाटते. त्याचप्रमाणें ध्येयसाधनेंत झालेला पराभव हा तत्त्वाची तडजोड करून साधलेल्या अर्धवट यशापेक्षा श्रेष्ठ असतो. पण क्षणभर, टॉल्स्टॉयचें व्यक्तिजीवन ही एक शोकान्तिका आहे असें मान्य केलें तरी त्यावरून त्याचें वाङ्मयीन जीवन ही शोकान्तिका कशी ठरते तें मला समजत नाही. आयुष्याचा अर्थ ( Meaning of Lile चें हें अपुरें भाषांतर आहे ) शोधण्याचा टॉल्स्टॉयनें आयुष्यभर प्रयत्न केला या प्रयत्नांत त्याला स्वतःविषयीं अनेकदा तिटकारा वाटला. पण या वाटचालींतच त्याला सत्याचे सुवर्ण-कण सतत सांपडले आणि त्याचें साहित्य या सत्यावरच अधिष्ठित आहे. जीवनांतील अनुभव बरे असतात त्याचप्रमाणें वाईटहि असतात. पण कला-वंताच्या मनाचा विचार करतांना आपल्या हें लक्षांत येतें कीं प्रत्येक अनुभव जीवन समृद्ध करणारा असतो, प्रतिभेची जोपासना करणारा असतो. टॉल्स्टॉयची प्रकृति शारीरिक आणि मानसिक प्रकृति सर्व तऱ्हेचें अनुभव आत्मसात् करण्यास अनुकूल अशी होती. हें करतांना त्याला स्वतःला अनेक चटके बसले पण या अग्निदिव्यांतूनच त्याच्या प्रतिभेला बहर आला. जगांत प्रेमाचें राज्य व्हावें व माणसांनीं साधेपणानें व सुखा-समाधानानें जगावें असें त्याला वाटत होतें. लोक बहुधा असें जगत नाहींत, आपण स्वतःहि अनेकदां असें जगत नाहीं हें त्याच्या लक्षांत येई. पण अंधारां-तील या प्रवासांत मधेंच प्रकाशकिरण आहेत हेंहि त्यानें अनुभवलें. अंधार–उजेडाच्या या अपूर्व नाट्याचें चित्रण हा टॉल्स्टॉयच्या साहित्याचा विषय आहे. स्वतःला ज्या उत्कटतेनें हें नाट्य प्रतीत झालें ती प्रतीति वाचकांना आणून देण्याचें सामर्थ्य त्याच्या कथा कादंबऱ्यांत आहे आणि म्हणूनच तंत्रदृष्ट्या अनेक उणीवा असूनहि त्याच्या साहित्याला अक्षर वाङ्मय म्हणून जगांत मान्यता मिळाली आहे.

---



अनुक्रमणिका






# उच्च शिक्षण आणि स्वतंत्र ( External ) परीक्षा

उद्योगधंदा, नोकरी करीत असल्यामुळें कोणत्याहि संलग्न ( affiliated) महाविद्यालयामध्यें नांव दाखल करून ज्यांना उच्च शिक्षण घेतां येत नाहीं अशा विद्यार्थ्यांकरतां आणि विवाहित स्त्रियांकरतां खासगी रीतीनें परीक्षेला बसण्याचा मार्ग पुणें विद्यापीठानें मोकळा केला आहे. या गोष्टीला ८।१० वर्षें झालीं. नागपूर विद्यापीठामध्यें ही पद्धति आज कित्येक वर्षें चालू आहे. विद्यार्जनास त्या प्रकारें अधिकाधिक प्रोत्साहन देण्याचा हा उपक्रम आजच्या लोकशाहीमध्यें अभिनंदनीयच आहे. पुणें विद्यापीठानें लोकशिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून बहिःशाल शिक्षणमंडळ सुरू केलें आहे. त्यांचें कार्यहि समाधानकारक चाललें आहे. त्याकरतां Board of Extra Mural Education सारखी स्वतंत्र व्यवस्था आहे. परंतु खासगी अभ्यास करून बसणाऱ्या विद्यार्थांची (External) संख्या ८।१० हजारांपर्यंत वाढली असूनहि या बाबतींत विद्यापीठानें आवश्यक असा मूलगामी विचार केल्याचें दिसत नाहीं. ऑगस्टमध्यें अशा विद्यार्थ्यांचीं नांवें नोंदणें ( Registration ) आणि पुढें वर्षअखेर परीक्षेला बसण्याचे अर्ज घेऊन त्याची इतरांबरोबर परीक्षा घेणें, त्यांस प्रमाणपत्रें देणें इतक्याच गोष्टी प्रामुख्यानें दिसतात. ही खाजगी विद्यार्थ्यांची संख्या उत्तरोत्तर वाढत जाणार आहे आणि इतर विद्यापीठेंहि या पद्धतीचा कमी-अधिक प्रमाणानें प्रारंभ करण्याचा संभव आहे. तेव्हां ज्या परीक्षापद्धतीचा हजारों विद्यार्थी फायदा घेणार आणि जेथें नांवनोंदणीचें आणि परीक्षेचें शुल्क लाखांनी मोजतां यावें, असें जमणार तेथें या प्रश्नाचा विचार अधिक सूक्ष्मपणें करण्याचा समय आला आहे असें वाटतें. संलग्न महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासाकरतां विद्यापीठें अनुदानमंडळाच्या शिफारशीला अनुसरून अनेक प्रकारें काळजी घेत आहेत आणि शिक्षण अधिक सकस आणि संस्कारयुक्त व्हावें म्हणून लेखनपाठादि ( Tutorials ) सोयी करून व विद्यार्थ्यांच्या एकंदर वर्षांतील अभ्यासाच्या प्रगतीकडे लक्ष्य पुरवून प्रगतीचीं पावलें टाकीत आहेत, केवळ संख्येपेक्षा गुणवत्तेवर लक्ष्य केंद्रित करणार आहेत, तर फार मोठ्या संख्येनें जे खाजगी विद्यार्थी ( external ) स्वतंत्रपणें परीक्षेला बसणार, त्यांच्या मार्गदर्शनाची सोय करून त्यांच्या ठिकाणीं खरी कार्यक्षमता आणण्याचा प्रयत्न योजनापूर्वक व्हावयास नको काय?

अशा स्वतंत्र खासगी ( external ) विद्यार्थ्यांना परीक्षेचें दार उघडें करणें हें केवळ पहिलें पाऊल होय. केवळ शेंकडा ३०।३५ गुण मिळवून परीक्षा उत्तीर्ण होणें, हें जसें संलग्न महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांच्या बाबतींत कृतकृत्य होण्याचें लक्षण नाहीं, तसें तें त्याच सदोष परीक्षा पद्धतीमध्यें उत्तीर्ण होणाऱ्या खासगी विद्यार्थ्यांचे बाबतींतहि मुळींच नाहीं. ज्ञानार्जनार्थ केलेले श्रम आणि संस्कार यांचा आढळ दोनहि ठिकाणीं दुर्मिळच. खाजगी विद्यार्थ्यांना महाविद्यालयामध्यें नियमित शिक्षण घेतां येत नाहीं म्हणून त्यांना परीक्षेपूर्वी दीडपट कालावधि आवश्यक मानला आहे—दोन वर्षांऐवजीं तीन वर्षें बी. ए. च्या परीक्षेकरतां द्यावीं लागतात. परंतु प्रत्यक्षामध्यें हा तांत्रिक नियम कसा अमलांत येतो हें पाहणें मोठें उद्बोधक होईल. पुष्कळदा या तीन वर्षांतील



अनुक्रमणिका






पहिलीं १।२ वर्षे नोकरीच्या व्यवसायामुळें तशींच निघून जातात. नंतर तिसऱ्या वर्षी आगस्टमध्यें परीक्षेकरतां नांवनोंदणी केल्यावर राहिलेल्या ४।६ महिन्यांमध्यें दहा पेपर्सची तयारी करण्याची अनवस्था कित्येकांच्या वाट्याला येते, ही वस्तुस्थिति आहे. यांपैकीं बहुसंख्य विद्यार्थ्यांना परीक्षा या घटनेमागें, असलेला संस्कारयुक्त विद्यार्जनाचा हेतु, ज्ञानार्जनाचा हव्यास, व्यक्तित्वाचा सर्वांगीण विकास इत्यादि शैक्षणिक मूल्यांचा विचार शिवत नाहीं. पदवीकरतां परीक्षा आणि नौकरीकरतां पदवी हेंच उद्दिष्ट आपल्या विद्यार्थ्यांपुढें असतें. त्यांच्याकडे वैयक्तिक लक्ष्य देणें ही गोष्ट संलग्न महाविद्यालयामध्येंहि शक्य होत नसते, मग खासगी विद्यार्थ्यांच्या विषयीं हा प्रश्न दूरच राहतो. या प्रकारें आदर्श समाजघटकामध्यें आवश्यक असें नेतृत्व, जबाबदारीची जाणीव, व्यापक दृष्टि, शारीरिक आणि आणि मानसिक गुणांचा विकास, शीलाची संपन्नता इत्यादि गोष्टींची अपेक्षा कशी करितां येईल ?

खाजगी परीक्षा पद्धतीविषयीं ( external examination ) आपणांस विशेषेंकरून विचार करावयाचा आहे. याविषयीं असें सांगण्यांत येतें कीं यूरप अमेरिका इत्यादि ठिकाणीं अशा प्रकारच्या परीक्षा आहेत तर आपणांकडे त्या कां नसाव्या ? परंतु हा केवळ अनुकरणाचा प्रश्न नाहीं. तेथें सायंकाळीं किंवा रात्रीं जे अध्यापनवर्ग असतात त्यांत शिक्षणाची व्यवस्था कशी असते, तेथें मिळणाऱ्या शिक्षणाचा दर्जा कोणता असतो हें पाहणें जरूर आहे. आपणांकडील अध्यापनवर्ग कसे चालविले जातात, त्यांत शिक्षक कोणत्या प्रकारचे असतात, त्यांस वेतन काय मिळतें, तेथे ज्ञानार्जनाचे संस्कार होणें अत्यल्प अवधीमध्यें कसें अशक्य असतें, हा विचार, महाविद्यालयीन शिक्षणाचा दर्जा वाढविण्याचे प्रयत्न करावयाचे असतां सर्वाधिक महत्वाचा आहे. आपणांकडे अशा खाजगी व्यवस्थेंमध्यें शिक्षकाची विद्वत्ता, अनुभव, याविषयीं किमान मर्यादाहि पाळल्या जात नाहींत. एम्. ए. चा विद्यार्थी बी. ए. क्लास शिकवितो. आज बी. ए. झालेला विद्यार्थी उद्या बी. ए. वर्गाचा शिक्षक होऊं शकतो. सुनियंत्रित शिक्षणसंस्थाप्रमाणें येथें विद्यापीठाचा निर्बंध नसल्यामुळें अशा ठिकाणीं नफातोट्याच्या तत्त्वास अनुसरून सर्व कांहीं चालावें यांत नवल नाही. शैक्षणिक मूल्यांचा विचार व्यवहारामध्यें कसा येणार ? केवळ इतर कांहीं अधिक सुसूत्र आणि विद्यापीठानें चालविलेली — त्यानें मान्यता दिलेली सोय उपलब्ध नाहीं, म्हणून निरुपायानें स्वतंत्र परीक्षा ( external examination ) देणारे विद्यार्थी अशा ठिकाणीं जातात, हें उघड आहे. परंतु गुणवत्तेच्या दृष्टीने अशा बहुसंख्य विद्यार्थ्यांकरितां विद्यापीठानें कांहीं केलें पाहिजे, असें जरा सूक्ष्म विचार करणारास वाटल्याशिवाय राहात नाहीं. सध्याच्या परिस्थितींत अशा विद्यार्थ्यांची केवळ दिशाभूल होते.

परीक्षा या केवळ पदवीच्या लेव्हलसाठीं आहेत ही समजूत नाहींशी व्हावी म्हणून अनुदान मंडळाकडून अनेक प्रकारें सुधारणेचे प्रयत्न चालू आहेत. परंतु वर सांगितलेल्या तुटपुंज्या शिक्षणसोयींशी संस्कारयुक्त शिक्षणाचा मेळ कसा बसणार ? हीच विसंगति कांहीं दिवसांपूर्वी एका प्राचार्यांनीं बालकमंदिरांच्या बाबतींत दाखविली. माँटेसोरीपद्धतीनें म्हणून चालविल्या जाणाऱ्या या अनेक ठिकाणच्या बालकमंदिरांची त्यांनीं संशोधनाच्या दृष्टीनें पाहणी केली आणि त्याचा निष्कर्ष स्पष्टपणें असा सांगितला कीं, बरींचशीं बालकमंदिरें म्हणजे केवळ राखण्या आहेत. अत्यंत कुशलपणें ज्यांचें शिक्षण झालें पाहिजे, त्यांच्या शिक्षणाची जबाबदारी सरकार घेत नाहीं आणि खाजगी प्रयत्न, साधनांच्या आणि अधिकारी शिक्षकांच्या अभावीं कार्यक्षम होऊं शकत नाहींत. आपली स्वतंत्र खाजगी परीक्षापद्धति






याच पातळीवर सध्या राहिली आहे ही गोष्ट कोणाहि विचारवंताच्या लक्ष्यांत यावी.

उच्च शिक्षण संस्कारयुक्त झालें पाहिजे, नुसतें परीक्षेकरतां नको, असें आपण म्हणतों, त्यावेळीं संस्कार म्हणजे काय याची स्पष्टता करणें जरूर आहे. यामध्यें शिक्षक आणि विद्यार्थी यांचा, बौद्धिक मानसिक स्वरूपाचा निकट आंतरिक संबंध अभिप्रेत आहे. तयार मिळणाऱ्या टिप्पणी (Notes) आणि प्रश्नोत्तररूप मार्गदर्शिका यांतील एकांगी आणि केवळ पुस्तकी, निर्जीव संबंध नव्हे. स्वतंत्र विद्यार्थ्यांना (external students) यांवरच प्रायः निर्वाह करावा लागतो. शिक्षण म्हणजे त्यांत चैतन्य पाहिजे, मनाचें आणि बुद्धीचें स्फुरण झाल्यामुळें त्यांत मनोमन सहकार्य घडलें पाहिजे ( Living touch ). त्यांत विद्यार्थ्यानें ( Self effort ) स्वयंप्रेरणेनें नवनवीन कृतीला प्रवृत्त झालें पाहिजे. शेक्सपीअरच्या शोकान्तिकेवर एखादी उत्तम टिप्पणी आयती तयार ( ready made note ) मिळाल्यानें हें मनःसंवादाचें–समरसतेचें कार्य होणार नाहीं. वर्गामध्यें अधिकारी शिक्षक शाकुंतल, हॅमलेट सारख्या पाठ्यपुस्तकाचें वाचन करीत असतां ज्या सौंदर्यस्थलांकडे लक्ष्य वेधतो, त्यांचा आस्वाद त्या सचेतन वातावरणांतच घेतला पाहिजे; त्यावेळीं होणाऱ्या संस्कारांचें महत्त्व चिरकाल टिकणारें–स्फूर्ति देणारें असतें. त्याकरतां पाठ्यपुस्तकाचें साक्षात् समालोचन पाहिजे; नुसतें सारांशरूपानें ग्रहण नको. कांहीं पाठ्यपुस्तकांचें अध्ययन अशा पक्वेपणानेंच योग्य वेळीं झालें पाहिजे. एकदा महाविद्यालयांतून बाहेर पडल्यावर हे संस्कार मिळणें कठिण. मनाची उदारता आणि सूक्ष्म संवेदनशीलता अशा वेळींच अंकुरित होते. या मनाच्या मशागतीत नैतिक, आध्यात्मिक वा उदार धार्मिक तत्त्वाचें आरोपण आपोआप होतें. हीच उच्चशिक्षणाची गुणवत्ता. खाजगी ( external ) विद्यार्थ्यांच्या बाबतींतहि या गोष्टींचें विस्मरण होऊं देणें इष्ट नाहीं. आतां या दृष्टीनें एक दोन विधायक सूचना करावयाच्या आहेत.

खाजगी विद्यार्थ्यांना नोकरीमुळें सकाळीं किंवा १० ते ६ पर्यंत आपला वेळ विद्यार्जनाकरितां देतां येत नाहीं. त्यांच्याकरितां कांहीं पर्याय अगर कार्यक्षम योजना पाहिजे. ठिकठिकाणीं संलग्न कॉलेजांची संख्या वाढत आहे, त्याचप्रमाणें आतां स्वतंत्र खाजगी विद्यार्थ्यांकरितां विद्यापीठानें सायंकाळीं ७ ते १० पर्यंत शिक्षणकार्य नियमितपणें करणारीं कॉलेजें काढण्यास परवानगी देण्याचा समय आला आहे. शक्य तितक्या बाबतींत त्यांचें कार्य दिवसा चालणाऱ्या संलग्न कॉलेजांप्रमाणेंच असावें. अभ्यासक्रम, शुल्क, प्रत्येक सहामाहीमध्यें लागणारी उपस्थिति, प्राध्यापकांचा दर्जा, त्यांचें वेतन, ग्रंथालयें इत्यादि गोष्टी दोनहि ठिकाणीं समानच असाव्या. सांस्कृतिक कार्यक्रम फक्त सुटीच्या दिवशीं घ्यावे. नेहमीच्या दैनंदिन व्यवस्थेंत ते बसणार नाहींत; परंतु एकंदरीनें विद्यापीठाच्या नियंत्रणाखालीं शिक्षणकार्य चालल्यास तीन चतुर्थांशापेक्षां अधिक काम अशा रात्रींच्या महाविद्यालयामध्यें होऊं शकेल. जरूर तर प्रत्येक सहामाहीमध्यें विद्यार्थ्यांची उपस्थिति थोडी वाढवावी. ग्रंथालयाचा उपयोग अधिक प्रमाणावर व्हावा. याप्रकारें शिक्षणाचा लाभ जर या खाजगी विद्यार्थ्यांस समग्र वर्षभर घेतां आला, तर त्यांच्यामध्यें इष्ट त्या बौद्धिक, मानसिक संस्कारांचीहि उणीव राहणार नाहीं. अशा रात्रीच्या महाविद्यालयाची तुलना अनेक ठिकाणीं सकाळीं चालणाऱ्या संलग्न आर्ट्स् कॉलेजांशीं बहुतांशीं होईल. संलग्न महाविद्यालयांत शिक्षण घेणारे विद्यार्थी आणि हे रात्रीच्या कॉलेजांतील विद्यार्थी यांमध्यें संस्कार, गुणवत्ता इ० आंतरिक गुणांच्यासंबंधें एकरूपता असूं शकेल. केवळ खाजगी विद्यार्थी विद्यापीठाच्या विवक्षित परीक्षेला इतरांप्रमाणें बसतात










अनुक्रमणिका

आणि उत्तीर्ण होतात एवढेंच बाह्यरूपाचें साम्य त्यांच्यांत असणार नाहीं. आपल्या सदोष परीक्षा-पद्धतीनें ३०।३५ गुण मिळवून उत्तीर्ण होणें ही गोष्ट शक्य असली तरी ती गुणवत्तेच्या दृष्टीनें समाधानकारक नाहीं, हें पूर्वी दाखविलेंच आहे. पूर्णता गौरवाय या दिशेने आपली सुधारणा व्हावयाची आहे. यावर्षी पुणें विद्यापीठाच्या प्रीडिग्री परीक्षेचा निकाल अत्यंत निकृष्ट लागला. त्याचें श्रेय, कोणतीच योग्य तयारी नसतां परीक्षेला बसणाऱ्या खाजगी ( external ) विद्यार्थ्यांकडे जाईल यांत शंका नाहीं. कोणतीहि परीक्षा वर्षभर योग्य मार्गदर्शनाखालीं केलेल्या प्रामाणिक प्रयत्नांची द्योतक असली पाहिजे. वेळोवेळीं त्याचें मोजमापहि घेतां आलें पाहिजे. रात्रीचें कॉलेज याविषयीं बरेंच उपयुक्त ठरेल.

विद्यापीठाला संलग्न असलेलीं रात्रीचीं कॉलेजें आवश्यक अशा सर्व ठिकाणीं निघूं शकतील असें नाहीं. त्याला आणखी एक पर्याय सुचविण्यासारखा आहे. तो म्हणजे विद्यापीठानें ज्यांना सामान्यपणें मान्यता दिली आहे अशा ( approved institutions ) —म्हणजे खाजगी महाविद्यालयीन विद्यार्थ्यांस नियमाने मार्गदर्शन करणाऱ्या आणि शक्य तें शिक्षण देणाऱ्या संस्था. संलग्न कॉलेजांइतकी जबाबदारी यांच्यावर टाकतां येणार नाहीं तरी त्यांच्या कार्यावर विद्यापीठाचें नियंत्रण असावें. परंतु खाजगी विद्यार्थ्यांना जेथे कांहींच साहाय्य नाहीं त्या ठिकाणीं कांहीतरी सुसूत्र सोय व्हावी हाच मुख्य हेतु. पुणें—मुंबईसारख्या मोठ्या शहरांत अनेक अध्यापनवर्ग चालतात त्याचप्रमाणें ते तालुक्याच्या जागींहि चालवण्याची कोशीस करावी. आणि विद्यापीठाने या कार्याकरतां एक समिति नेमून त्या सर्वांचें नियमन करावें. अनेक तालुक्यांच्या ठिकाणीं मोठमोठीं हायस्कुलें चालू आहेतच. प्रीडिग्री क्लासचें कार्य हळुहळु अशा शिक्षण सोयींनी संपन्न अशा हायस्कुलांकडे सोंपविण्याची ही कल्पना आहे. त्याच कल्पनेला अनुसरून खासगी विद्यार्थ्यांना विद्यापीठाच्या परीक्षांचें मुक्तद्वार असेंच ठेवावयाचें असेल तर त्या त्या ठिकाणीं निदान इंटर, बी. ए. अथवा तीन वर्षांच्या पदवीपरीक्षेचा संपूर्ण अभ्यासक्रम, याचें मार्गदर्शन आणि शक्यतें शिक्षण खासगी विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें आवश्यक आहे. संमत शिक्षणवर्गांच्या ( approved institutions ) व्यवस्थेमध्यें परिस्थित्यनुरूप मान्यतेकरतां केलेले नियम थोडे सैल असले तरी हरकत नाहीं. जेथें काहींच नाहीं, तेथें या कार्याची उभारणी करावयाची आहे. शिक्षणकार्य करण्यास पुरेशी जागा, शिक्षणसाहित्य, चांगलें ग्रंथालय, या गोष्टी आवश्यक आहेतच. अध्यापनाचें काम करणारे शिक्षक एकवेळ एम्. ए. सेकंड क्लास पाहिजेत असें बंधन न ठेवतां, ते एम्. ए. असून अनुभवी, आणि आपापल्या विषयाची आवड असणारे असावे. व्यवहार्यतेच्या दृष्टीनें नियंत्रण असावें. अध्यापनवर्गांच्या साधनसामग्रीची योग्यायोग्यता आणि पुरेपणा विद्यापीठाच्या नियामक समितीनें ठरवावा. आणि अशा संमत संस्था स्थापन होण्यास उत्तेजन द्यावें. हें दिग्दर्शन आहे. पूर्वी दहावर्षांपूर्वी जेव्हां (External examinations) खासगी विद्यार्थ्यांना परीक्षाचें द्वार मोकळें केलें, त्यावेळी, इतर गोष्टींबरोबर खासगी विद्यार्थ्यांकरितां अशा विद्यापीठानें मान्य केलेल्या संस्था असाव्या, आणि खासगी विद्यार्थ्यांनीं त्यांत योग्य तो अभ्यासक्रम पूर्ण करून परीक्षेला बसावें अशी सूचना त्या अहवालामध्यें होती. स्वतंत्र खासगी रीतीनें परीक्षेला बसण्याची प्रथा रूढ झाली परंतु आवश्यक तें मार्गदर्शन आणि पूर्वतयारी याविषयींची महत्त्वाची शिफारस तशीच राहिली. खासगी विद्यार्थ्यांची ( external students ) वाढती संख्या लक्षांत घेतां आतां त्यांना योग्य तें साहाय्य आणि मार्गदर्शन नियमितपणें मिळण्याची यंत्रणा अस्तित्वांत आणणें, हें शिक्षणतज्ज्ञ आणि शिक्षणाच्या आंतरिक मूल्यांची जपणूक करणारे विचारवंत, यांना आवश्यक वाटेल अशी आशा आहे.

श्री. ज. शा. देशपांडे

# एका अनामिक कवीचें द्रौपदी-स्वयंवर

तंजावर येथील सरस्वती महाल ग्रंथालय संकीर्ण कवितांची हस्तलिखितें चाळतांना एक अनामिक कवीचें द्रौपदीस्वयंवर आढळलें. हें काव्य २३८ कड-व्यांचें होतें पण त्यांतील १९६ पासून पुढचीं कडवीं तेवढीं उपलब्ध झालीं. उपलब्ध भागांत देखील त्रुटित भाग बराच आहे. कांहीं शब्द लिहितांना लेखकाचा कांहींतरी प्रमाद झाला असावा. त्रुटित स्वरूपांतहि या काव्याला थोडें महत्त्व आहे. हें काव्य वाचल्यावर धव-ळ्यांची आठवण येते. काव्याची चाल थोडेफार धव-ल्यांच्याच धर्तीवर आहे. महदंबेच्या धवळ्यांत चार ओळींचें कडवें येतें व साधारणतः दर दोन ओळी प्रास-युक्त असतात. द्रौपदीस्वयंवरांतहि प्रास आहेत. मूळ पोथींत चरण पाडले होते ते बरोबर आहेत कां कसें काय हें मात्र ठरवावें लागेल. बरीचशीं कडवीं चार चरणांत बसणारीं आहेत.

या काव्यांत पुष्कळ जुने शब्द आहेत व हें काव्य चवदा पंधराव्या शतकांतलें असण्याचा संभव दिसतो. परंतु सबंध काव्य उपलब्ध झाल्याखेरीज काळाबद्दल नीट अनुमान करणें कठीण. या काव्याचा उपलब्ध भाग खालीं दिला आहे. कंसांत घातलेले शब्द दुसऱ्या कडव्यांच्या अनुरोधानें त्रुटित भाग पुरा करण्यासाठीं घातले आहेत.

बोऊळ्या आला। बसिदि–री कुरवंडिया वोवा-ळिले। व्यास (होम) सा(री)...(सी) घ्रगति। नवरा नवरी बोऊळ येती। बासरले मंत्र...(गोरी) हराचे...(च)र्ण प्रक्षाळिती। आठरी हांक वाजे। सकळि वऱ्हाडिते आरोगीति॥ ९६॥ भी(म)... (वि)व्हाचारी दीवस भरले। वोहरे अभोलि(क) सुदले। गवरव कौंतीयेसी। भीमविवाहाचा दीवसें भरति। नवरा अर्जुने। द्रुपदा तेल लागलें॥ ९७॥ तुरंग पलाणिला क्षण...(वे)लें गेले पारथ। पाउडी सोनियांचि हिरेचि मणियाली। यौटां रत्नजडिता। नवरा चंढ(विला)तयावरी॥ ९८॥ लक्ष कोटि वाद्ये बहुत। नवरा अर्जुन प्रणु असे जात। हे देखा पंडुपुत्र। हें देखा...नि मा देवाचा नातु॥९९॥ नवरा अर्जुन ... सभे मंडपा आला। आरत्या कुरवंडिया वोवा-ळिला। बसीवीला सुवर्णपाटीं। द्रुपदरायें मधुपर्क केला। दीधली...(वस्त्रें स)र्व आद..(रे) लेववि(ला) ॥ २००॥ (लगिनघ)डी व्रत तो बाहेरीं गेला। जोसी सावधान म्हणालें। धरिती आंत्रपाट। अर्जुना द्रुपदें लग्न लागलें। पंचमहाशब्द वाजीवले। इंद्रादि सर्वें जयजयीकारु केला॥ २०१॥ द्रुपदें अर्जुना कन्या-दान (के)लें। बहुत आंदणें द्रुपदें बोलिलें। कंकण ब्रां...। मंत्री वोव्हर बोऊळ्या आलें। बसीवीलें सुवर्णपाठीं। आरत्या कुरवंडी (या) वोवाळिलें ॥ २०२॥ व्यास होम सारी...(सीघ्र) गति। नोवरा नोवरी बऊळ्यावरी येती। बा(सिंग) बांधले। मंत्री वोहोराचें चर्ण प्रक्षाळिती। आठरा (प)कान्न। सकळि वऱ्हाडिते आरोगिती॥ २०३॥ आर्जुन...(व्हिवा) चारि दिवस भरलें। वोहर अमोलिक साडे सुदलें। गवरव कुंतियेसी। अर्जुन विव्हाचारी दिवस भरति। नवरा नकुळ सहादेव। द्रुपदा देविसी तेल लागले ॥ २०४॥ लक्ष कोटी वाजती वाद्यावणि। नवरा नकुळ सहदेव चढिनेले सोखासनि। आहवा मंगलें गाति। पुढें भाट पवाडे वर्णिती।...विमानी आरुढले देव। नकुळ सहादेव नवरा पाहों ठाकती। २०५॥ नकुळ सहादेव नवरा सभामंडपा आले। आरत्या कुर... (वंडि या वोवाळिलें। बसीवीले सुवर्णपाठीं। द्रुपद-रायें (मधु) पर्के केले। दीधली देवांगें। सर्व आलं-कार लेव (वीले)...लघीन घडीं ब्रतें तों बाहेरी गेले॥ २०६॥ जोसी सावधान म्हणतिलें।, धरिती अंत्रपाट। लकुल साहादेव...(नवरा) लग्न लागलें। पंचमाहाशब्द कानीं नेलें। इंद्रादिक...(देवें) जयजयीकारु केला॥ २०७॥ द्रुपदें लकुळ साहा-देव कन्यादान केलें। बहुत आंदण द्रुपदें बोलिलें।... बांधिलें। मंत्री वोहर बोऊळ्या आलें। बसीवीलें...






( सुवर्ण ) पाठीं । आरत्यां कुरवडीया वोवाळिलें ॥ २०८ ॥ व्या... ( स होम ) सारी सीघ्रगती । नवरा नवरी वोवळ्या येती । ब... ( सिं ) गें बांधलें । मंत्रि वोहराचे चर्ण प्रक्षाळिती । आ ... पक्वान्नें । सकळि वऱ्हाडीतें आरोगिती ॥ २०९ ॥ लकुळ सहादेव विन्हाचारिं दिवस भरलें । वोहरा... ( अ ) मोलिक साडे सूदहें । गौरव कोंतियेसी । लकुळ विन्हाचारि दिवस भरिती । थोरीया संभ्रम... असी पांचाचि लग्न लाविती ॥२१०॥ असि ते पांचाजणी वरीयेली । पुणता पुणतीते नवि नवरी । ... ( एव्ह ) डे सामर्थ्य तांचें । पांचाजणांची येक असुरी । २११ ॥ पद्मराजे पड कोडि लक्षा । येन्या भंडारा करून...क्षा । गौरव कोंतियेसी । घेऊनिये वसे राजा गोपाळा ॥ २१२ ॥ आंधकार पडे सत्रसिरींगीरी । हस्त...पातले बाहेरी । दचकला दुर्योधन । कोण आले आम्हावरी । येक मात जाणविती । राया पां ( डवांचा )...देव मुरारी ॥ २१३ ॥ पांडवा आहे ऐसा आगाज ( ऐ ) किला । मग दुर्योधन उभा कांपिनेला । घातले धरणियेसी । प्रधाणा अणवण जाणविती ।...म्हणति काये जाली । राया फोडि लागली ! म्ह.... ॥ २१४ ॥ आतां तरी आतां कैसी करीजे । द्रपद रायावरी कटकाई कीजे । द्रपदराज्या हे पांड...( वा ) म्हि दवडिजे ॥ २१५ ॥ आतां तरी आतां कैसे करीजे । हा येकळा भीम धरिजे । येर मज आंगवति । भीम बांधुनि दुर्गी घालिजे ॥ २१६॥ आतां तरि आतां कैसी करीजे । द्रपद रायावरी कटकाई करिजे । सत्रंग शैन्ये... । त्याच्या दुर्गासि घालावा वेढा । येरमड...आंगवति । हे पांडव गाई कुमरा ॥ २१७ ॥ द्रोण भीष्म...( म्ह ) णति हें भलें जालें । पांडवि तुमचें कायरे केलें । लाखाघर उभउनी । आज्ञा लाऊनी त्यासी जाळिलें । त्या कृष्णें सारथी । निभ्रांत त्याणेंचि रक्षिलें ॥ २१८ ॥ द्रोण भीष्म म्हणति हें भलें जालें । पांडवि तुमचें काय रें केलें । चुकला गोत्रवध तेव्हां चाले । आमच्यानि दैवें ॥ २१९ ॥ ततक्षणि विदुरासी हाकार केला । विदुरा तूं जाई पांचालिया नगरा । आफावी पांडव । द्रपदाचें ठाई असती । सर्वालंकार भूषणें ।... ईजे तव विदु पाठविला । त्यासी घेऊनी झडकरी येई ॥२२०॥ ततक्षणि विदुरु तो बाहेरि निघाला । पांचाळी नगरी तो सीघ्र पातला । बहुत देखे मेलिकारु । हें शैन्य कृष्णरायाचें । वेणें गुढर दुसें । ध्वजास्तंभावरी गरुड का झळके ॥ २२१ ॥ विदुर गरुडध्वज ठका देखिला । हरिखें जालानि रा येथें कृष्ण आला । घातला नमस्कारु । तुज शरण गा भेदी निमाला ... ज प्राणवल्लभा । आजी कृष्णराव वीर । मिळाला ... ॥ २२२ ॥ कृपासागर हरी सामोरे आले । निजकरें कर विदु उठविला । जवळि बैसविला । कर ठेला त्याच्या मस्तकावरी । आपुला म्हणुनियां । त्यासी नुपेक्षी कवणीयो परी ॥ २२३ ॥ धर्म पुसे तेथील सांगावी मात । काय करीति आमुचे हस्तिनापुरीचे सोईरे । तव विदु बोलियेला । मी मुळ आलो असो तुम्हां ॥ २२४ ॥ धर्म ... ( पु ) स तेथील सांगावी मात । आज्ञनु तुम्हा करू पाहताती घात । कोपले भीष्मदेव । अर्धराज्य ... म्हणतिलें । इतकें जो तेथें जालें । मग मी मुळ आलो असो तुम्हां ॥ २२५ ॥ धर्म पुसे आतां कैसे करीजे । गांवा जाईजे कीं येथेचि राहिजे । तव कृष्णें बोलियेलें । तुम्ही जावें हस्तिनापुरां । असा सज्ञान पुरुष । कासया लागीं रे राहाल सासुरा ॥ २२६ ॥ हस्ती साजीलें घोडे पलाणिले । पांडव हस्तनापुरां चालिले । कौंति द्रपदा देवी । त्या चढि पुरा चालिले । कोंति द्रपदादेवी । त्या चढिनेल्या सोलासनि । कृष्ण द्रपदराव । हें दोघेहि आरत्ती बोलवीत ॥ २२७ ॥ पांडव राऊळा माझारी गेले । द्रोणा भीष्माचीया चरणा लागले । ताता नेणता एक आळि केली । द्रपदाचे कुमरीतें पांचाजणि वरियेली ॥ २२८ ॥ द्रोणभीष्म म्हणती हें भलें जालें । हें तियेचें पुरवील वरदान । हे तुम्हां कीर्ति जाली । म्हणति केले मातेचें वचन ॥ २२९ ॥ पांडवा आला राउळिच्या हाकार । तव धर्म बोलियेला । आम्हा नाहीं आरोगणा येणें । कृष्ण द्रपदराव । आम्हा सरीसे दोघे पाहुणें ॥ २३० ॥ पांडवा आंगोळी माजन्ने जालीं । उत्तम वस्त्रें देवांगें दिधली । आणिती चंदन तया पांडव आंगि लाविती । आणिती नागचांपें तया पांडवा करीं वोपिती ॥२३१॥ सोनियाचे जे ठाई ठेविती । षडरस पक्वान्ने कोने विस्तारिति । दिधली आपोशन । विप्र त्याचे पाथी बैसविति ॥ २३२ ॥ धर्म राजनीति आरोगिले । कापुरसहित वीडे घेतले । मंचकीं विसावलें । येरव वधेहि ( ? ) जवलि बैसले । भाटें ब्रीद पढती । पुढें भाट पवाडे वर्णिती । हा देखा अर्जुन । जाणें राय-

रायेत्र भेदिले ॥ २३३ ॥ दुर्योधनु त्याचे करीतसे खंती । आपण देखतां आणिखाति वानिती । धृतराष्ट्र जया । हें राज्य वाढुनिया दीजे ॥२३४॥ हस्ती घोडे म्हणति जरी जन्मु चांगा । तरी आम्ही जाऊं धर्माचिया भागा । मुके हे आश्वजाति । आपुलें ठाईं बोल करीती । आवो आंबिके माते । तुज वाहो कापुर विडे । आवो लक्ष्मुमि माये । आम्हा घाली धर्माचिये कडे ॥ २३५ ॥ बटकि दासी म्हणती जरी जन्मु चांगा । तरी आम्ही जाऊं धर्माचिया भागा । आवो आंबिके माते । तुज वाहो कापुरें विडे । आवो लक्षमी माये । आम्हा घालि धर्माचिये कडे ॥ २३६ ॥ पांडव इंद्रप्रस्थानि निघाले । तेथील दिसती बरवे हे वन्न । तंव धर्म बोलियेला । येथें दिसती पूर्वजाचिये स्थानें ॥ २३७ ॥ पांडवालागीं नग्र उभवीलें । माड्या मढियाले देउळें बहुत । दिसति सुवर्णाचि । जैसे दिसती रत्नखचित । द्दपदिसैंवर कृष्णाचें चरित्र । गातिया पुण्य ऐकिल्या पवित्र । जें गाती आइकती । त्यांच्या पुण्या नाहीं मीति । जे गाती भक्तिभावो । पुर्वजा होये उध्रागति ॥ २३८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु.

---





अनुक्रमणिका






श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# मास्को-दर्शन

## ( ४ )

ता. ८ ऑगस्ट रोजीं रशियन दुभाष्यांबरोबर मी मास्कोविद्यापीठाचें म्हणजे इमारतीचें आतून अवलोकन केलें. या नव्या इमारतींत विज्ञानशाखां-चेंच अध्ययन व अध्यापन चालतें. साहित्य, कला व सामाजिक विज्ञानें यांचें शिक्षण जुन्या झारशाही-च्या कारकीर्दींत शहराच्या मध्यवस्तींत बांधलेल्या इमारतींत चालतें. मास्को विद्यापीठाच्या या दोन शाखांशिवाय विद्यापीठाचा दर्जा असलेल्या तन्त्र-विद्येच्याहि खाणी, पाणी, कोळसा, पोलाद इ. धातु, वीज, बागबगीचा, भूस्तर, शेतकी, इत्यादि विषयांचें तंत्रज्ञान देणाऱ्या पुष्कळ शिक्षणसंस्था मास्कोंत व अन्यत्र सोविएट देशामध्यें आहेत. विज्ञानशाखेच्या स्टॅलिनच्या कारकीर्दींत बांधलेल्या या इमारतींतून विचारपूस करीत व जागोजागीं थांबत फेरफटका करण्यास आठ तास अपुरे पडले. यावेळीं मला सहज आठवण झाली की, 'इन्साईड रशिया' या पुस्तकाच्या चौकस व मार्मिक लेखकानें लिहिलें आहे कीं मास्को विद्यापीठाचें समग्रदर्शन व माहिती घ्यावयांस तीन महिनेहि पुरायचे नाहींत. हा फेर-फटका करतांना त्या त्या विज्ञानशाखेस उपयुक्त वस्तुसंग्रहालयें व प्रयोगशाला या विद्यापीठास जोड-लेल्या पाहिल्या; फिरतां फिरतां माझ्या पायांना जशीं उसंत नव्हती तशी वाणीलाहि नव्हती. मी अनेक प्रश्न विचारले; त्यांतील काहीं प्रश्नांचीं उत्तरें दुभाषी देऊं शकला, व काहीं प्रश्नांचीं उत्तरें त्या त्या स्थानीं भेटलेल्या जाणकार व्यक्तींकडून मिळ-विलीं. पुष्कळ प्रश्नांचीं उत्तरें मिळूं शकलीं नाहींत. काहीं प्रश्न जिभेवर येऊं पाहणारे मी आवरले. एकं-दरींत मास्कोंतील अकरादिवसांच्या अवधींत शेकडों सोविएट नागरिकांशीं वार्तालाप करण्याची संधी मला मिळाली. एकंदरींत असा अनुभव आला कीं, स्वतःच्या विशिष्ट व्यवसायाबाहेरची माहिती असलेले किंवा ती जाणून घेण्याची उत्सुकता बाळगणारे सुशिक्षितां-तहि फार थोडे आढळले. त्यामुळें असा भास होतो की आपल्या विशिष्टक्षेत्राबाहेरच्या व्यवसायाबद्दल वा जगाबद्दल सोविएटदेशाचा नागरीक उदासीन वृत्ति बाळगणारा असावा. या गोष्टीस एकच अपवाद दिसतो, तो म्हणजे धंदेवाईक राजकारणी होय. सरकारी राजकारणी प्रचार मात्र रात्रंदिवस कानावर आदळत असल्यामुळें त्या प्रचारातून मिळालेली माहिती व निर्माण केलेली भावना यांचा एकांगी संस्कार तेवढा नागरिकांत दिसून येतो.

विनामूल्य शिक्षण ही घोषणा सोविएट राज्य-शासनाने तंतोतंत पाळली आहे. बालशिक्षण व प्राथमिक शिक्षण यापासून तों अत्युच्च विद्यापीठीय शिक्षणापर्यंतचें सर्व शिक्षण पूर्ण मोफत मिळविण्याचा हक्क सर्व देशवासीयांना येथें मिळाला आहे व तद-नुरूप योजनाहि अमलांत आणल्या आहेत. सर्व शिक्षण मोफत व पुस्तकें अत्यंत स्वस्त हें सोविएट-देशाचें वैशिष्ट्य आहे. मास्कोविद्यापीठाच्या दोन प्रवेशद्वारांवरील उभय कक्षांवर दिसणाऱ्या विद्यार्थी-विद्यार्थिनींच्या हातांतील पुस्तकांत रमलेल्या संगम-रवरी पाषाणांच्या भव्य मूर्तींचें दर्शन सोविएट-देशांतील पुस्तकमहिमा सूचित करतें, हातोडाकोय-त्यांचें प्रतीक कर्ममहिमा सूचित करतें. कर्म आणि ज्ञान यांची सांगड घालणारें राष्ट्रच उत्कर्षास पोहो-चतें. उत्कृष्ट कागदावर सुरेख छापलेली सुबक-



अनुक्रमणिका






बांधणीचीं पुस्तकें इतर देशांशीं तुलना करतां निम्मे-पेक्षां कमी किमतीत येथें मिळतात. बाजारांतून घर-गुती जिनसांची खरेदी करून परतणाऱ्या वीस थैल्या-मध्यें एकादी विकत घेतलेल्या पुस्तकांचीहि थैली दिसते. रेलगाड्या, बसगाड्या वगैरे वाहनांतून प्रवास करणाऱ्या गर्दींत पुस्तक वाचनांत गर्क झालेले नागरीक वारंवार दिसतात. गर्दीच्या ठिकाणी लोक गोंगाट करत नाहींत व सार्वजनिक वाहनांतून प्रवास करणारे घोळके आपसांत बोलत किंवा गप्पा छाटत नसतात, त्यामुळें वाचन निर्वेधपणें होऊं शकतें. सर्वसामान्य सुशिक्षित स्त्रीपुरुषांना व लहान मोठ्यांना वाचनाची आवड फार आहे. याचें निदर्शन लोकांच्या खाजगी बिऱ्हाडांच्या जागांमध्ये मिळतें. बहुतेक शिक्षितांच्या बिऱ्हाडी वाचनीय पुस्तकांची अलमारी आढळते. हें पाहून मला एक संस्कृत सूत्रवाक्य सुचलें—'साम्यवादिनि देशेऽस्मिन्पुस्तकं मस्तके धृतम् ।'

मास्को–विद्यापीठांत व लेनिनग्राड विद्यापीठांत शिष्यशिक्षक संख्येचा अनुपात काय आहे, म्हणजे विद्यार्थ्यांच्या संख्येशीं शिक्षकांच्या संख्येचें प्रमाण काय पडतें, याची मी चवकशी केली. त्यांत असें समजलें कीं १२ विद्यार्थ्यांस १ शिक्षक किंवा संशोधक कार्यकर्ता असें सरासरी प्रमाण मास्कोविद्यापीठांत किंवा लेनिनग्राड विद्यापीठांत आढळतें. शिक्षक नसलेले संशोधक सोडल्यास १६ विद्यार्थ्यांस १ शिक्षक असें प्रमाण बसत असावें, असें मी धरून चालतों. कारण शिक्षकापेक्षां संशोधन करणारे साहजिकच थोडे असतात. संशोधन करणाऱ्यातहि कांहींना अध्यापन करावें लागतें. येथें परीक्षापद्धति अत्यंत कडत आहे. परीक्षेचें स्वरूप मुख्यतः मौखिक म्हणजे तोंडी असतें. परीक्षा म्हणजे शिक्षक व विद्यार्थी यांची प्रश्नोत्तररूप किंवा पूर्वोत्तरपक्षरूप चर्चा होय. अध्यापनामध्येंसुद्धां उलटसुलट तपासणी चालते. शिक्षकानें बोलत रहावें व विद्यार्थ्यांनी नुसतें ऐकत रहावें असें क्वचित चालतें. विद्यार्थी विषय तयार करतो याचा अर्थ साधकबाधकरीतीनें तपासून ध्यानांत ठेवतो. असें सांगतात कीं, सोविएट देशांतील कामगाराकडून व्यवस्थापक चोपून जास्तींत जास्त काम घेतो. तीच गोष्ट शिक्षण-क्षेत्रासहि लागू आहे. कच्चया शिक्षणाला तेथें क्षमा नाहीं.

मॅट्रिक किंवा शालान्त परीक्षांमध्यें ६५ टक्के गुण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांनाच विद्यापीठीय व्यापक-शिक्षण देणाऱ्यासंस्थांमध्यें प्रवेश मिळतो; त्यापेक्षा कमी गुण मिळवणाऱ्यांना लहानमोठ्या विशिष्ट उद्योगांचें शिक्षण घेण्याकरतां पाठवितात. ६५ टक्यांपेक्षा अधिक गुण मिळवण्याची जबाबदारी, विद्यापीठांतील प्रत्येक श्रेणीमधून वरील श्रेणींत जातांना, पार पाडावी लागते. कांहीं विषयांत आवश्यक तितके गुण व कांहीं विषयांत कमी गुण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांना राहिलेल्या विषयांची तयारी पुनः करण्यास अवसर मिळतो. त्यास सहामाही किंवा वर्ष अशा अवधीची मर्यादा नसते. दोन तीन महिन्यांतहि तयारी झाल्यास वरच्या श्रेणींत प्रवेश मिळण्यास हरकत नसते. शालान्त परीक्षा झाल्यानंतर विशिष्ट विषयांत, विशिष्टतंत्रविद्येंत किंवा विशिष्ट बौद्धिक शाखेंत प्रवेश मिळतो. त्याकरितां त्या त्या विषयास अनुसरून आवश्यक असलेली विशिष्ट प्रवेश परीक्षा घेतली जाते. भिन्न विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं भिन्न योग्यता असते. एका विषयांत ज्याचें डोकें चालत नाहीं त्याचें दुसऱ्या एकाद्या विषयांत चांगलें चालू शकतें हा सिद्धांत लागू केला जातो असें वाटतें. 'सब बाराटक्के' असें घडत नाहीं. त्यामुळें प्रत्येकाला आपापल्या विशिष्ट योग्यतेचा प्रत्यय येतो. त्यामुळें लायक व्यक्तींची लायकी वाया जात नाहीं. विज्ञान व तंत्रविद्या यांची महती सोविएटदेशांत फार आहे, त्यामुळें गणिताच्या प्रावीण्याला प्रधानपद दिलें आहे. तेथें गणिताची व आधुनिक तर्कशास्त्राची कदर अत्यंत आहे. कारण गणित व तर्कशास्त्र हाच विज्ञान व तंत्रविद्या



अनुक्रमणिका






यांचें मूलभूत अधिष्ठान होय. याची जाणीव ही आधुनिक पाश्चात्यसंस्कृतीची महान् प्रेरक शक्ति आहे, सोविएटदेशांतील शिक्षणपद्धतींत ही जाणीव भिनली आहे, हें प्रत्ययास येतें.

शिक्षणक्षेत्रांत विशिष्ट वर्गांतील विद्यार्थ्यांना विशेष सवलती सोविएट शिक्षण पद्धतीनें दिल्या आहेत. कामगार, सैनिक, कम्युनिस्टपक्षीय, क्रांति-कालांत १९१७ पासून तो १९२३ पर्यंतच्या अवधींत हुतात्मे झालेल्यांचे आप्तवर्गीय, अथवा दुसऱ्या महायुद्धांत कामास आलेल्या लोकांचे निकट-संबंधी यांच्या कुटुंबियांना शिक्षणविषयक सवलती प्रथम उपलब्ध करून दिल्या जातात.

प्राथमिक, माध्यमिक व विद्यापीठीय शिक्षणाच्या सर्व श्रेणी यांच्यामध्यें कम्युनिस्टपक्षाचा इतिहास व मार्क्सलेनिनवाद यांचें शिक्षण सक्तीचें केलेलें आहे; व त्याच्या परीक्षाहि पुनः पुनः द्याव्या लागतात. उच्च विद्यापीठीय विद्यार्थ्यांना पुनः पुनः तेंच तेंच घोकावें लागतें. त्यामुळें अनेक सुशिक्षित विद्यार्थी या कंटाळवाण्या काथ्याकुटाबद्दल आपसांत कुरकुरत असतात. कित्येकांना तर पक्षपुराणांच्या पुस्तकांकडे पाहून अखेरीस शिसारी येऊं लागते. विज्ञान, तंत्रविद्या व मानवजातिशास्त्र यांच्या विद्यार्थ्यांना या पोपटपंचीचा कांहीं उपयोग आहे, हेंच पटत नाहीं. आधुनिक इतिहास, राजकारण, अर्थशास्त्र, संस्कृतिचिंतन, धर्म आणि तत्त्वज्ञान यांच्या संबंधांत मार्क्सलेनिनवादाच्या कल्पनांचा संदर्भ धरून सक्तीने विचार करावा लागतो. त्यामुळें या विषयांतील वैचारिक स्फूर्तीला व संशोधनाला मार्क्सलेनिनवादाच्या काटेरी कुंपणांतून अंग बचावून मार्ग काढावा लागतो.

सर्व सोविएट राष्ट्रसंघामध्ये रशियन भाषा सक्तीने सर्वांना शिकावी लागते. भारत जसा भिन्न प्रांतांचें संघराज्य आहे तसा सोविएटदेश भिन्न-संस्कृतीच्या व विविधभाषांच्या राष्ट्रांचे संघराज्य आहे. त्यांतील अनेक राष्ट्रांच्या भाषा क्रांतीनंतरच साक्षर व ग्रंथनिविष्ट भाषा झाल्या. या सर्व भाषांना विद्यालयांत व विश्वविद्यालयांत शिक्षणाचें माध्यम म्हणून मान्यता मिळाली आहे. परंतु युरोपियन सोविएट राष्ट्रें सोडल्यास आशियांतील राष्ट्रांच्या बहुतेक भाषा साहित्य व ज्ञान यांत अत्यंत मागासलेल्या आहेत. त्यामुळें रशियन भाषा सर्व सोविएट राष्ट्रांमध्यें शिक्षणाचें माध्यम म्हणून अत्यंत मान्यतेस पोहोचलेली आहे. इंग्लिश, जर्मन व फ्रेंच या पाश्चात्य भाषा जशा ज्ञानविज्ञानसंपन्न व साहित्यानें समृद्ध आहेत तशीच व तितक्याच तोलाची रशियन भाषा आहे. रशियनभाषेचें हें थोर वैशिष्ट्य असल्यामुळें आणि ती संघराज्याची राज्यव्यवहार-भाषा असल्यामुळ सोविएट देशांतील सर्व राष्ट्रांचे विद्यार्थी रशियन भाषेला मातृभाषेपेक्षा अधिक महत्त्व आपोआप देऊं लागले आहेत. मास्को येथील प्राच्यविद्यापरिषदेस सोविएटदेशांतील भिन्नभाषिक प्रतिनिधि मोठ्या संख्येने उपस्थित होते. त्यांच्यांतील पुष्कळांचें मत असें दिसलें की शैक्षणिक उन्नतीचें एकमेव त्यांना उपलब्ध असलेलें श्रेष्ठ साधन रशियनभाषाच आहे. रशियन भाषेंतील ग्रंथसंपत्ति इतकी विशाल आहे व तिची वाढ अद्ययावत् पद्धतीने इतकी झपाट्यानें होत आहे कीं तिच्याशी तुलनाकरतां आशियाई सोविएटच्या भाषा तिच्या पासंगालाहि पुरणार नाहींत. रशियाची राजकीय पकड अत्यंत जबरदस्त आणि भाषाहि अत्यंत प्रभावी असल्यामुळें नजिकच्या भविष्यकाळांत आशियाई सोविएटराष्ट्रें द्विभाषी बनणें अनिवार्य आहे. सर्व सोविएट आशिया भाषेने व संस्कृतीने रशिया बनण्याचीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं आहेत.

रशियन भाषा झारशाहीच्या कारकीर्दींतच वैज्ञानिक परिभाषेने संपन्न होऊन आधुनिक विज्ञानाचें वाहन बनली. एकोणिसाव्या शतकांतील अग्रेसर साहित्य रशियन कलाकारांनी निर्मिलें आहे. गेल्या



अनुक्रमणिका






शतकांतील रशियन साहित्यकार जगांतील साहित्यकारांत श्रेष्ठ ठरले आहेत. गोर्कीची प्रतिभासुद्धां क्रांतिपूर्वकालांतच भरास आली होती. क्रांतीनंतरच्या काळांत रशियाने विज्ञानांत व विशेषतः तंत्रज्ञानांत जरी आघाडी मारली असली तरी साहित्याच्या व ललितकलेच्या क्षेत्रांत पूर्वीच्यासारखा एकहि नामवंत तेथें निपजला नाहीं. हें काहींहि असो; क्रांतीनंतरच्या काळांत रशियन भाषा विश्वसंस्कृतीची वाहन बनावी अशातऱ्हेचे भाषिक अभिवृद्धीचे अफाट कार्यक्रम अमलांत आणले जात आहेत. इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश, इटालियन इत्यादि पाश्चात्य भाषांतील आणि चिनी, जपानी, बंगाली, तमील, हिंदी, फारसी, अरबी, संस्कृत, पाली इत्यादि पूर्वेकडील भाषांतील ललितसाहित्याचा व शास्त्रीयसाहित्याचा अनुवाद व भाषांतर करण्याचा रशियनांनी सपाटा चालविला आहे. बालझाक्, झोला, व्हिक्टर-ह्यूगो, थॉमसमॅन वेल्स्, शॉ इत्यादिकांच्या समग्र-ग्रंथावल्यांनी रशियनभाषेंत पुनः अवतार धारण केले आहेत. इतर भाषांतील शास्त्रीय किंवा वैज्ञानिक ग्रंथच नव्हेत तर नियतकालिकेंहि प्रतिवर्षी दशसहस्रांपेक्षा अधिकसंख्येने भाषांतरित होत आहेत.

साहित्य व ज्ञान यांच्या क्षेत्रांत डोळे दिपवण्यासारखीं कार्ये चाललेलीं दिसत असलीं, तरी वृत्तपत्र सृष्टींत बाहेरच्या जगाबद्दल अंधारांत ठेवण्याची प्रवृत्ति खिळलेली दिसते. माझ्या अनेक हिंदीपरिचितांना यासंबंधी मी विचारलें. वृत्तपत्रें हीं वृत्तपत्रें नव्हेंतच, असें ते म्हणाले; तीं मतपत्रें आहेत. येथें अनेक वर्षें राहिलेले हिंदी लोक भारतांतून आलेल्या नव्या अभ्यागतांशीं किंवा स्वतंत्र युरोपांतून आलेल्या यात्रिकांपाशीं पहिलें मागणें मागतात तें ताज्या वृत्तपत्राचें, आठवडा पंधरा दिवसांचें शिळें असलें तरी त्यांना तें ताजेंच वाटतें. भारत व चीन किंवा नेपाळ व चीन यांच्या संबंधांत खरोखर काय घडत आहे, यासंबंधीं जाणण्याची स्वाभाविक उत्सुकता त्यांच्यामध्यें असते. चौकस व सुशिक्षित विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या एका गटांत मी एकदा बराच वेळ बसलों होतों. पॅरिसची शिखरपरिषद् कशी उधळली या संबंधाची पृच्छा ते करीत होते. शिखरपरिषद् उधळली एवढीच बातमी त्यांना होती व ती त्यांनी सहस्र वेळा ऐकली होती, तरी क्रुश्चेवच्या भाषणाशिवाय दुसऱ्या कोणाचेंहि भाषण एका अक्षरानेंहि त्यांना ऐकावयास किंवा वाचावयास मिळालें नव्हतें. स्वतंत्र जगांतील रेडिओ मधून मधून स्वतःच्या मालकीच्या रेडिओपेटींतून ऐकावयास मिळतों, परंतु त्यांतहि रेडिओ विक्षेपक ( जॅमिंग् ) पुष्कळवेळां होतें. घरगुती पत्रें मिळतात, परंतु मिळण्यास कडक तपासणीमुळें फार उशीर लागतो.

मास्को विद्यापीठांत पूर्वेकडील देशांतील विद्यार्थ्यांची संख्या यावेळीं चौदाशें आहे. बरेचसे विद्यार्थी विज्ञान व तंत्रविद्या शिकण्याकरतां आले आहेत. चिनी विद्यार्थ्यांची संख्यासुद्धां बरीच आहे. हे विद्यार्थी इतरांमध्यें मुळींच मिसळत नाहीत, इतरांशीं बोलणें टाळतात, एकलकोंडे राहतात. त्यामुळें त्यांना कोणत्या विद्याशाखेमध्यें किती अवसर मिळतो, हें समजणें कठीण. परंतु भारतीय विद्यार्थ्यांचा अनुभव असा आहे कीं, इंग्लंड, अमेरिका किंवा युरोपांतील स्वतंत्र देश यांच्यामध्यें भारतीय विद्यार्थ्यांना तंत्रविद्येंत जितका अवसर मिळतो तितका रशियांत मिळत नाहीं. अनेक विद्यार्थ्यांना याकरितां विषय बदलावे लागले आहेत किंवा देश बदलावे लागले आहेत. तेथें पिलानी येथील श्री. वार्ष्णेय या विद्यार्थ्याची गोष्ट कळली. तो मास्कोला अणुविद्येकरतां आला होता. निराश होऊन अखेरीस त्यानें डेन्मार्क येथील कोपेन् हॅगेन् च्या विद्यापीठांत प्रवेश मिळविला. मी असतांना तो कोपेन् हॅगेनहून भारताकडे परततांना मास्को येथे उतरला होता. तो म्हणाला ‘ रशियांत तिकडे जिकडे गुप्ततेचें बंड फार आहे. विशेषतः वैज्ञानिक व तांत्रिकशाखांमध्यें तें बेसुमार माजलें आहे. ’






मास्को विद्यापीठांतील कँटीनकडे मी रोज सकाळसंध्याकाळ उदरभरणार्थ जात असे. कँटिन व जाण्यायेण्याचा मार्ग विद्यार्थिनी यांनी फुललेला असावयाचा. स्त्रिया व पुरुष यांच्यामध्यें आरोग्य, कांति व खणखणित प्रकृति सारखीच छान दिसून येई. विद्यार्थी व विद्यार्थिनी यांची संख्याहि जवळजवळ सारखी दिसली. तरुण व प्रौढ विद्यार्थी–विद्यार्थिनी एकमेकांत निःसंकोचपणे खुल्यादिलाने मिसळत होते. विद्यापीठाच्या लहानमोठ्या सर्व प्रकारच्या सेवाकार्यांत स्त्रियांची संख्या अधिक आहे. उपकरणांचीं व पुस्तकांचीं दुकानें यांत व आहारगृहांत केवळ स्त्रियाच होत्या. कारकुनाचीं व क्रयविक्रयाचीं कार्यें प्रामुख्यानें स्त्रिया करतात. विद्यापीठांतील वसतिगृहांतील पुरुषविद्यार्थ्यांच्या व महिला विद्यार्थ्यांच्या खोल्या व दालनें एकमेकांना लागून आहेत. स्त्रियांच्या वेशभूषेंत विशेषतः केशरचनेंत वैचित्र्य आढळतें. भारतांतील स्त्रियांच्या केशरचनेचे जुने नवे सर्व प्रकार मास्कोविद्यापीठांतील महिलांच्या केशरचनेंतहि दिसून आले.

मला विशेष गोष्ट दिसली ती ही की, महिला व पुरुष विद्यार्थी यांच्या राहण्याच्या खोल्या एकमेकांस लागून होत्या; परंतु एका आठवड्याच्या अवधींत या संबंधांत परिवर्तन घडवून आणण्याचा विद्यापीठाचे वरिष्ठ अधिकारी प्रयत्न करीत आहेत, असें दिसलें. वसतिगृहांतील डाव्याबाजूच्या व उजव्याबाजूच्या जिन्यांच्या रांगांमध्यें प्रत्येक मजल्यावर दीडफूट रुंदीची जाडी भिंत रचली जात होती. अगदी प्रथम त्या ठिकाणीं बांधकामाचा माल तेवढा पडलेला होता. भिंत रचली जात असतां माझा मुक्काम संपत आला होता. तेथील मुकादमाला दुभाष्यातर्फे मी विचारलें कीं या डाव्या–उजव्या समांतर जिन्यांच्या मध्यें भिंती उभारून या सुंदर महालाची शोभा का बिघडवित आहांत ? त्याने उत्तर दिलें कीं, आतां येत्या वर्षापासून विद्यार्थिनी व विद्यार्थी यांच्या राहण्याच्या खोल्या वेगळ्या गटांत विभागावयाच्या आहेत आणि तरुण–स्त्री पुरुषांनी विद्यापीठाच्या आवारांत एकत्र मिसळूं नये. म्हणून या जिन्यांच्या तोंडावर पहारेकरी बसवायचे आहेत. विद्यापीठांतून मी मुक्काम हालविला त्यावेळीं या भिंती पुऱ्या झाल्या होत्या. मी मनांतल्यामनांत ‘ सनातन धर्मकी जय ’ असा घोष केला.

— अपूर्ण.

---






## वाचकांचा पत्रव्यवहार –

### भवभूतिसंबंधीं :

कार्यकारी संपादक, नवभारत मासिक

' नवभारत ' मासिकाच्या सप्टेंबर ६०च्या अंकांत श्री. ल. द. बेंद्रळकर यांचा ' भवभूतिसंबंधी कांहीं नवीन माहिती ' या मथळयाचा एक लेख आला आहे. या लेखांतील नवीन माहितीमुळें कांही अपसमज प्रचलित होण्याची शक्यता वाटल्यामुळें मुद्दाम हें पत्र लिहीत आहे. कांहीं संस्कृत नाटकांमधून अप्रत्यक्षपणें भवभूतीचा निर्देश आढळतो आणि त्यावरून त्याच्यावर प्रारंभी टीका कां आणि कोणत्या प्रकारची झाली असावी यावर प्रकाश पडतो असें लेखकाला वाटतें. परंतु हें दाखवितांना ' अस्माकं बदरीचक्रं युष्माकं बदरीतरुः ' असाच प्रकार झाला आहे. म्हणूनच या उल्लेखांची थोडक्यांत चर्चा येथें करीत आहे.–

( १ ) भवभूति या नांवासंबंधी लिहितांना " भवभूति याच नांवाने एका शिष्याचें पात्रहि यायावरीय कवि राजशेखर याने आपल्या प्रचण्डपाण्डव नाटकांत रंगविलेलें आहे. हा कवि आपणास भवभूतीचा अवतारच समजतो. " अशी माहिती लेखकाने दिली आहे. वस्तुतः भवभूति हें पात्र राजशेखराच्या ' बालरामायण ' नाटकाच्या चौथ्या अंकाच्या प्रारंभी मिश्रविष्कम्भांत आलें आहे. परशुरामाचा शिष्य भवभूति त्याच्या युद्धपिपासु वृत्तीला कंटाळून अन्य उपाध्याकडे अध्ययनासाठीं येतो असा प्रसङ्ग तेथें दर्शविला आहे. तथापि या उल्लेखावरून कवि भवभूतिसंबंधी कांहीं नवीन माहिती मिळण्यासारखी नाहीं. फार तर इतकेंच म्हणतां येईल कीं भवभूतिविषयीं आदर असल्याने स्वाभाविकपणें राजशेखराने एका पात्राला त्याचें नांव दिलें. बालरामायणांत राजशेखराने भवभूतीचें भरपूर अनुकरण केलें असल्याचें उघड दिसतें. उत्तररामचरिताच्या दुसऱ्या अंकाच्या प्रारंभी विष्कम्भकांत भवभूतीने आत्रेयी नांवाची वाल्मीकीची शिष्या अन्य उपाध्यायाच्या शोधांत दण्डकारण्यात येते असें दाखविलें आहे. तत्सदृश प्रसङ्ग रंगवतांना भवभूतीविषयीं आदर व्यक्त करण्यासाठीं या शिष्याचें भवभूति असें नांव राजशेखरानें ठेवलें असावें. ' स्थितः पुनर्यो भवभूतिरेखया स वर्तते संप्रति राजशेखरः ' या त्याच्या उक्तीवरून तो स्वतःला भवभूतीचा अवतार समजतो आणि अर्थातच भवभूतीविषयीं त्याच्या मनांत आदरभावना वसत होती हें उघड आहे.

( २ ) उदुंबर या भवभूतीच्या नांवासंबंधी लिहितांना लेखक म्हणतो. " याच नांवाचा सहजगत्या उल्लेख एका समकालीन नाटकांत मिळतो ' उदुम्बरनाम्ना चारेण सह ' अशा रीतीने मुद्राराक्षस नाटकांत उल्लेख आलेला आहे. अमात्य राक्षस एका हेराबरोबर पळून जात आहे. त्या हेराचें नांव उदुम्बर. वास्तविकपणें हेराला कोणतें नांव द्यावें, हा प्रश्न लेखकाचा आहे. उदुम्बर हें नांव त्यानें हेतुपुरःसरच दिलें आहे, असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. पण लिखाणाची धाटणी पाहतां हें नांव त्या नाटककर्त्यानें बुद्धिपूर्वक दिलें आहे असें वाटूं लागतें. असें पहा –' अन्यत् प्रारम्भे, अन्यत् निर्वहणे ' म्हणजे सुरवातीला एका हेतूची रचना, आणि शेवटीं उपसंहाराच्या वेळीं कांहीं अगदीं निराळी रचना असा कुकवीचा दोष त्या नाटककर्त्यानें दाखविला आहे. "

यासंबंधीं प्रथमच असा खुलासा केला पाहिजे कीं लेखकमहाशय म्हणतात असा प्रसंग मुद्राराक्षस नाटकांत कोठेंच आढळत नाहीं. त्यांच्या लिहिण्यावरून ' अन्यत् प्रारम्भे, अन्यन्निर्वहणे ' अशा प्रकारचें वाक्य उदुम्बराला उद्देशून म्हटलें असावें असा समज होतो. वास्तविक सहाव्या अंकाच्या प्रवेशकांत समिद्धार्थकानें सिद्धार्थकाला उद्देशून ––

'तत्किंनिमित्तं कुकविकृतनाटकस्येवान्यन्मुखेऽन्यन्निर्वहणे '

असें वाक्य म्हटलें आहे. या वाक्याचा उदुम्बराशीं किंवा भवभूतीशी बादरायणसंबन्धाखेरीज अन्यसम्बन्ध कदापि जोडतां येणार नाही. उदुम्बर हें पात्र मुद्राराक्षसांत कोठेंहि रंगविलेलें नाहीं. केवळ सहाव्या अंकात ––

**पुरुषः**

' एष स प्रदेश आर्यचाणक्यायोदुम्बरेण कथितो यत्र मयाऽऽर्यचाणक्याज्ञप्त्याऽमात्यराक्षसः प्रेक्षितव्यः । '

असा उदुम्बराचा ओझरता उल्लेख आला आहे. हा भवभूतीचा अप्रत्यक्ष उल्लेख आहे असें म्हणणें हास्यास्पद होणार आहे. समिद्धार्थकाने सिद्धार्थकाला उद्देशून उच्चारलेल्या वाक्याचा उदुम्बराशीं सम्बन्ध जोडावयाचा तर ' बालरामायणां ' तहि सूत्रधारानें पारिपार्श्वकाला उद्देशून म्हटलेल्या ' कथमन्यदुपक्रान्तमन्यदाप-



अनुक्रमणिका








तितम्' या वाक्याचा त्याच नाटकांतील भवभूतीशीं सम्बन्ध जोडण्यास कोणता प्रत्यवाय आहे ? म्हणूनच—

"त्याच्या नाटकांत इतर काय दोष होते, तें आज आपणांस या लेखांत पाहावयाचें नाहीं. त्याच्यावर सपाटून टीका झाली होती, आणि ती 'निर्वहणाकुल' झाल्यामुळें असावी, असें अनुमान फारसें चुकणार नाहीं. त्याच संबन्धांत नांव घेऊन मुद्राराक्षसकर्त्या विशाखदत्तानें भवभूतीस उदुम्बर नांवानें संबोधिलें असणें अप्रयोजक वाटणार नाहीं."

हा लेखकाचा निष्कर्ष किती चुकीचा आणि अप्रयोजक आहे हें स्पष्ट होईल. विशाखदत्ताच्या कालासंबन्धी कांहींच निश्चय होण्यासारखा नसल्याने त्याला भवभूतीचा समकालीन ठरवणेंहि युक्त नाहीं.

(३) याच सम्बन्धांत लेखकमहाशय म्हणतात—

"त्याच विशाखदत्त कवीने असा दोष दाखविला आहे, असें नाहीं. जिनसेन नामक एक जैन कवि त्याच सुमारास होऊन गेला. त्यानेंहि आपल्या महापुराणांत असें लिहिलें आहे —

यथेष्टं प्रक्रतारम्भाः केचित् निर्वहणाकुलाः ।
कवयः बत सीदन्ति कराक्रान्तकुटुम्बिवत् ॥

—म्हणजे निर्वहणाकुल पुष्कळ कवि त्याकाळीं होते."

जिनसेनाने महापुराण लिहिल्याचें अजून कोणाला सांपडलेलें नाहीं ! संस्कृत महापुराण गुणभद्राचें असून प्राकृत महापुराण पुष्पदन्ताचें आहे. तेव्हां वरील अवतरण कोठीलहि असो, पण त्याचा भवभूतीशीं बादरायणसम्बन्धहि जोडतां येत नाहीं. भवभूतीच्या महावीरचरितांत निर्वहणाकुलत्वाचा दोष आतांपर्यंत कोणी दाखविलेला नाहीं आणि दाखवितां येण्यासारखाहि नाहीं.

(४) महावीरचरितांतील आणखी दोष दाखविण्यासाठीं लेखक म्हणतो— "या विचाराला आणखी एक बाजू आहे; उदुंबराला हेरच कां केलें असावें ? याचें उत्तर दोन प्रकारांनीं देतां येईल, एक तर महावीरचरितांत 'हेरखातें' प्रमाणाधिक्यानें वावरत आहे. आणि राजकीय उलाढाली बऱ्याच उरकलेल्या आहेत." वस्तुस्थिति अशी आहे कीं उपर्युक्त दोन्ही दोष ते दोषच असतील तर मुद्राराक्षसांत आहेत; महावीरचरितांत नव्हे ! महावीरचरितांत प्रत्यक्ष हेरगिरि शूर्पणखेकडे दिलेली आढळते आणि एका हेराचा (चार) अप्रत्यक्ष उल्लेख आहे. याला प्रमाणाधिक्य म्हणतात का ? याच्या दसपट हेर मुद्राराक्षसांत आढळतात. पुढें तर लेखकानें अगदी परस्परविरुद्ध विधानें केलीं आहेत. तीं नुसतीं उद्धृत करणेंच पुरे !

"त्या नाटकाची बैठकच राजकीय नाहीं तर इतके हेर कशाला ? राजकीय बैठक कशी, तीं परशुरामानें रावणाला लिहिलेल्या पत्रावरून अगदीं स्पष्टपणें कळून येईल ?"

(५) महावीरचरितांतील आणखी एक दोष दाखविण्यासाठीं लेखकमहाशय म्हणतात—

"दुसरें असें कीं — अनर्घ्यराघव नांवाचें एक नाटक मुरारि नांवाच्या एका कवीनें लिहिलेलें आहे. त्यांत त्यानें असें लिहिलें आहे कीं, 'केनचित् कलहकन्दलनाम्ना दक्षिणापथात् आगतेन कविना नित्यं किल अयम् उद्वेजितः लोकः' हा उल्लेख स्पष्टपणें भवभूतीच्या महावीर चरितास लागूं पडत नाहीं काय ?" हाहि उल्लेख इतर सर्व उल्लेखांप्रमाणें चुकीचा आहे—

'अनर्घ्यराघव' नाटकांतील वाक्य पुढीलप्रमाणे आहे:—

"कुतश्चिद्द्वीपादागतेन कलहकन्दलनाम्ना कुशीलवन ... नित्यं किलायमुद्वेजितो लोकः ।"

या वाक्याचा भवभूतीशीं अर्थाअर्थीहि संबन्ध जोडतां येत नाहीं. भवभूतीवर टीका कोणत्या प्रकारची झाली हा प्रस्तुत विषय नसल्यानें त्यासंबन्धी येथें विचार करण्याचें कारण नाहीं. श्री. बबळकरांनीं सगळींच विधानें (जीं कांहीं नवीन आहेत तीं) इतकीं निष्काळजीपणें आणि निखालस चकीचीं कशीं केलीं याचें मात्र नवल वाटतें.

—चिं. त्र्यं. केंधे

---

## माधवस्वामी : कालनिर्णय

श्री. रा. रा. सम्पादक, नवभारत, यांस,

नवभारताच्या सप्टेम्बर १९६० च्या अंकांत माझ्या 'माधवस्वामी : कालनिर्णय व एकनाथ संबंध' या लेखावर टीका करणारा श्री. ना. ब. जोशी यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांनीं घेतलेल्या प्रमुख आक्षेपांवर माझें उत्तर मी खालीं देत आहे:—



अनुक्रमणिका






(१) श्री. ना. ब. जोशी म्हणतात, " माझा एक महत्त्वाचा निर्णय कीं नाथमहाराजांची मुलगी माधवस्वामीची आई नव्हे हा त्याना पूर्णपणें मान्य आहे." हा निर्णय श्री. जोशी यांनीच प्रथम घेतलेला आहे काय ? त्यांच्या लेखापूर्वीहि हा निर्णय घेतला गेलेला आहे. पहा– माधवस्वामी हे शहाजीचे court poet असल्याचेंहि सांगण्यांत आलें. परंतु त्यांच्याजवळ याबद्दलचा पुरावा मी मागितला असतां अजूनपर्यंतहि त्यांनीं तो दिलेला नाहीं. डॉ. तुळपुळे यांनीं कदाचित् तेथील लोकांवर विसंबून तें विधान–माधव–शहाजी–गुरुशिष्यसंबंधाचें– केलेलें असेल ! मला वाटतें डॉ. तुळपुळयांनींच दाखविलेल्या गुरुशिष्यसंबंधावर श्री. ना. ब. जोशी " शहाजीराजांचे माधवस्वामी हे गुरु होते " असें विधान करीत असावेत ! तसें नसेल तर त्यांनीं ही माहिती कोठून मिळविली तें सांगावें म्हणजे सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें तें फार बरें होईल.

( ४ ) डॉ. तुळपुळे यांनीं माधवस्वामीबद्दल जें सरकारी टिप्पण मिळविलेलें आहे त्याबद्दल श्री. जोशी एक अवाक्षरहि काढीत नाहीत हें एक आश्चर्यच नव्हें काय ? या सरकारी पुराव्याप्रमाणें माधवस्वामी शके १६६१ त म्हणजे इ. स. १७३९ त मंदिराचे ' स्थानिकम् ' व पुजारी म्हणून विद्यमान होते असें स्पष्ट दिसतें. जर श्री. ना. ब. जोशींचे मताप्रमाणें शके १५७० हा माधवस्वामींचा जन्मशक मानला तर माधवस्वामी शके १६६१ त ९१ वर्षे वयाचे असतांना हयात होते हें त्यांना मान्य आहे काय ? कारण ते माधवस्वामींची हयात शके १५६९/७० ते शके १६३५ च्या सुमाराची म्हणजे सुमारें ६५ वर्षांचीच मानतात ! जर शहाजीराजे शके १६३३ मध्यें निवर्तल्यावर लवकरच दोन तीन वर्षांनीं त्यांचे गुरु माधवस्वामी गेले असावेत. ...स्वामी तंजावर प्रांतीं केव्हां गेले ह्याबद्दल महासारस्वतांतच श्री. वि. ल. भावे म्हणतात–

' कांहीं दिवसांनीं ( शके १५९७ चे सुमारास ) हे भीमस्वामी शिवाजीमहाराजांबरोबर तंजावर प्रांतीं गेले ... या भीमस्वामींच्या बरोबरच तंजावर प्रांतांत गेलेले दुसरे शिष्य अनंतस्वामी व राघवस्वामी " म. सारस्वत ४ थी आवृत्ति पान ५१७. या सर्व विधानांच्या आणि रामदासी संशोधन खंड १ व २ यांच्या अनुरोधानें मी शके १६०० च्या तंजावरच्या भेटीचें विधान केलेलें आहे.

### ( ३ ) शहाजी व माधवस्वामी — गुरुशिष्य संबंध —

शहाजी जरी दानशूर व विद्येचा पोशिंदा असल्याचा उल्लेख डॉ. तुळपुळे हे प्रो. श्रीनिवासन् यांच्या ' Maratha Rule in the Carnatic" या ग्रंथाच्या आधारे करीत असले तरी त्यांनीं उल्लेखिलेला गुरुशिष्यसंबंध-माधवस्वामी व शहाजी यांचा–मात्र वरील पुस्तकांत किंवा तंजावरच्या कोणत्याहि पोथींतून अजूनपर्यंत उल्लेखिलेला मला आढळलेला नाहीं ! इतकेंच नव्हें तर या मे महिन्यात मी तंजावरला संशोधनासाठीं गेलों असतां सरस्वती महाल लायब्ररींतील लोकांकडून मला " माधवस्वामी तिचे पुत्र व एकनाथांचे दौहित्र, या कल्पनेलाहि मग कसलाच दुजोरा मिळत नाहीं " पान ३७ ( प्रस्तावना ) मुक्तेश्वर कृत विराटपर्व : द. सी. पंगु तसेंच डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या पुरवणीतील माहितीवर प्रा. पंगूंनीं घेतलेला निर्णय पहा–

" माधवस्वामी हा मुक्तेश्वराचा सख्खा मावसभाऊ असल्याचा आपल्या कल्पनेचा खेळ, कोणातरी अशाच रामदासी महाभागानें सरस्वती महालांत सांपडणाऱ्या एकनाथांच्या या वंशावळीच्याद्वारा अलीकडेच मांडला असावा ! " पान ५० तत्रैव तेव्हां मला वाटतें मी काय किंवा श्री. ना. ब. जोशी काय, दोघेहि प्रा. द. सी. पंगूंचेंच मत पडताळून पाहत असल्यानें या निर्णयाचें जनकत्व पंगूनाच देणें बरें !








(२) शके १६०० च्या तंजावर भेटीचा उल्लेख पहा –

" ३७ शके १६०० काल्युक्ताक्षि संवत्सरः–

(४) येकोजीराजे समर्थांस चंदावरीं घेऊन गेले. त्यावेळीं मल्हार निंबदेव येलूरकर यांस चवदा मणांच्या मूर्ति तयार करण्यास सांगून आले."

पान ४६४ स. खं. आळतेकर कृत श्रीसमर्थ-चरित्र.

श्रीसमर्थचरित्रांत ही माहिती समर्थवाकेनिशी टिप्पणावरून घेतलेली असून हें टिप्पण विश्वसनीय आहे असें डॉ. र. वि. हेरवाडकर मानतात. तसेंच या मित्या जंत्रीवरून खऱ्या ठरतात असें श्री. राजवाडेहि मानतात. असें श्री. जोशी यांचें मत असेल तर माधवस्वामी शके १६६१ त हयात असल्याबद्दलच्या सरकारी पुराव्याबद्दल त्यांचें काय म्हणणें आहे? का सरकारी दस्तऐवजच बनावट आहे?

## (५) माधवसुतांच्या आधाराबद्दल –

माधवसुत लिहितात, " पुढेंहि वर्णन करून ताताज्ञेनें, स्वप्नांत ईश्वराज्ञेनें हरिवंशावर टीका केली." यांतील माधवस्वामींनीं केलेली आज्ञा शेवटचीच होती कशावरून? तसेंच माधवसुतास माधवस्वामींनीं ही स्वप्नांत केली असती तर त्यांनीं नुसते ईश्वरानुज्ञेनें असें न म्हणतां " स्वप्नांत ताताज्ञेनें असें म्हटलें असतें किंवा स्वप्नांत ताताज्ञेनें व ईश्वरानुज्ञेनें असेंच म्हटलें असतें.' माधवस्वामी या वेळेस अतिवृद्ध झाले असतील म्हणून त्यांनीं आपल्या मुलास हरिवंश व भागवत दशमस्कंधावर लिहिण्यास सांगावें यांत गैर काय होतें? तेव्हां या ओळींचा अर्थ प्रत्यक्षांत ताताज्ञेनें–माधवस्वामींनीं व स्वप्नांत ईश्वरानें–आराध्यदैवत श्रीरामानें–आज्ञा केल्यानें, असा घेणेंच योग्य होईल असें मला वाटतें.

या सर्व मुद्यांवरून मला वाटतें मी माझ्या लेखांतून मांडलेले विचार योग्य असून अजून तरी, नवीन पुरावे उपलब्ध होईपर्यंत, त्यांत बदल करण्याची आवश्यकता वाटत नाहीं.

## (६) एकनाथ विचार

प्रथमतः मी येथें स्पष्ट करूं इच्छितों कीं मीं सुचविलेला एकनाथ हा तर्काधिष्ठित आहे. जर माधस्वामींचे आजे एकनाथ महाराज नसून दुसरे कोणीतरी एकनाथ आहेत असें दिसतें असें म्हटलें तर दुसऱ्या एकनाथाचा शोध घ्यावा लागतो. त्या दृष्टीनें मी हें एक पाऊल टाकलेलें आहे. वासुदेव पंडितांनीं एकनाथांचा संबंध त्यांच्या मुलीकडून दाखविलेला होता. म्हणून मीहि स्मृतिकौस्तुभकार अनंत देवाचा पूर्वज एकनाथ याचा संबंध मुलीकडून दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. या एकनाथास उतारवयांत कन्या होऊन तिला नागनाथापासून शके १५९० च्या सुमारास पुत्रोत्पत्ति होणें शक्य आहे असें मत मी मांडलेलें आहे. या मतानुसार मी दिलेला शक १५२५ हा अंदाजें एकनाथाचा जन्मशक मानलेला आहे.

या एकनाथवादांतूनच अखेर सत्य एकनाथदर्शन होईल असें मला वाटल्यानें मी हा तर्क लोकांसमोर मांडलेला आहे. 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' इतकेंच मला म्हणावयाचें आहे.

आपला

— वसंत पारखे

## अर्थशास्त्रीय परिभाषेच्या– टिपणांच्या निमित्ताने

प्रा. व. गो. सहस्रबुद्धे यांच्या उत्तराची (नवभारत-ऑक्टोबर ६०) मला नाइलाजाने दखल घ्यावी लागत आहे. माझें प्रामाणिक आवाहन त्यांच्या विकृत उत्तरानें गढुळलें जाऊं नये म्हणून!











माझ्या व प्राध्यापकमहाशयांच्या मूळ भूमिकेंतच फरक आहे. अर्थशास्त्र हें शास्त्र म्हणून मराठींत यावें व त्याची मराठींतच जोपासना व्हावी असें मला वाटतें. इंग्रजींतील कथन मराठींतच आणण्याची केवळ भाषांतऱ्याची माझी भूमिका नाहीं. मी पूर्वींच सुचविल्याप्रमाणें मराठींत बरीच पुस्तकें झाल्यानें अर्थशास्त्राच्या किंबहुना समाजशास्त्रांच्या बाबतीत मराठी माध्यम प्रयोगावस्थेच्या पलीकडे गेलें आहे असें मी समजतों. अशा वेळीं परिभाषेचा चिकित्सक अभ्यास होणें अतिशय निकडीचें होऊन बसलें आहे. शास्त्राच्या व विद्यार्थ्यांच्या हिताच्या दृष्टीने !

उलट प्राध्यापकमहाशयांची भूमिका निव्वळ उपयुक्ततावादी आहे. त्याचें वर्णन परीक्षेसाठी वाचन व या वाचनापुरतें अध्यापन याहून वेगळ्या शब्दांत मला करता येत नाहीं. विद्यार्थ्यांना येनकेनप्रकारेण समजणें वेगळें व त्यांना काय उमजलें पाहिजे याचा विचार करणें वेगळें. पैसा = Money यावरील माझें भाष्य त्यांना समजलेलेंच नाहीं. Credit + Currency ( पत + चलन ) दोन्ही मिळून पैसा. मराठींत प्रचारांत असलेला Currency चा अर्थ नुसतें चलन असा आहे. तो पैशाचा एक भाग झाला. चलनांत पैशाची व्यापकता ( + पत ) येत नाहीं. Bank Rate म्हणजे सारांशाने व्याजाचा दर असें जर प्रचारांत आणलें गेलें तर ज्या हुडया वटविणाऱ्या संस्थांच्या (Discount Houses) अस्तित्वामुळे तो दर रूढ व परिणामकारक होऊं लागला तर त्याचा इतिहासच मुळीं वाचकांना समजावयाचा नाहीं. Open Market operations ( रोख्यांची खरेदी विक्री ) मुळे व्याजाच्या दरावर जसा प्रत्यक्ष आघात होतो. तसा Bank Rate मुळे होत नाहीं. Bank Rate बदलल्याने त्याची जशी झळ Discount Houses व बँका यांना लागेल तसा अप्रत्यक्षपणे व्याजाच्या दरावर ( Interest Rate ) परिणाम होईल. हा Bank Rate चा कमकुवतपणा Bank Rate म्हणजे व्याजाचा दर म्हटल्याने कसा कळणार ? "Balance" चे आतां उघडउघड दोन अर्थ झाले. एक बाकी. दुसरा तोल. शास्त्राच्या दृष्टीने कोणता बरोबर ? प्रतिकूल देणेबाकी, अनुकूल येणेबाकी म्हटल्याने काय खटकलें ? Trade cycle चें व्यापारी कालचक्र हें भाषांतर कडवट आहे. पण त्याच वेळीं हेंहि सांगायला हवें की तें "तेजीमंदीचें रहाटगाडगें" नव्हे. प्रा. महाशयांचा पूर्वीं न नमूद केलेला आणखी एकच शब्द घेऊं. Quota = घडा. Import Quota आयात घडा. ( चलन-शास्त्र व चलन-नीति पृ. १६३. ) माझें पढिक ज्ञान मला घडा म्हणजे घागर, घट, मडकें ( महाराष्ट्र शब्द-कोश भाग ३ रा पृष्ठ १०५० ) एवढेंच शिकवतें. म्हणून घडा = Quota हें मला बोचतें. Imports हा एक मोठा जलाशय असून त्यांतून घड्याघड्याने जलभरण करणें म्हणून दूरान्वयाने आयात घडा हा अर्थहि माझ्या अरसिकत्वाला स्पर्श करणारा नाही.

परिभाषा करतांना मराठी प्रतिशब्दाला मराठींतच कोणता वेगळा अर्थ चिकटला आहे हें ध्यानांत घ्यावयास हवें. हें मीं Service=सेवा या उदाहरणाने स्पष्ट केलें. पण हें ध्यानांत न घेतां प्रतिशब्द मांडला जात आहे. व हा प्रतिशब्द चुकीचा तर नसेलना असा संशय येऊनच की काय लगेच कंसात इंग्रजी शब्द देण्याची प्रथा मराठींत आतां पडत असावी. या प्रथेचाच विस्तार म्हणून कदाचित् प्रा. सहस्रबुद्धे सबंधच्या सबंध इंग्रजी अवतरणें देत असावेत. जणुं आपल्या मराठीची त्यांना खात्री नसावी. म्हणूनच विद्यार्थ्यांनी वेगवेगळे शब्द ( Bank Rate=बँकाचा दर, व्याजाचा दर बँक रेट किंवा पुनः हुंडी कटमितीने वटविण्याचा दर, ) वापरले तरी त्या "बिचाऱ्यांना" नापास करूं नका ( कारण ते नापास झाले तर प्राध्यापकमहाशयांचेंच अज्ञान उघडें पडावयाचें ) असा प्रा. सहस्रबुद्धे यांना उपदेश करावा लागत आहे.

मराठी परिभाषेंत गोंधळ नाहीं, हें सध्या तरी असेंच चालवयाचें अशी सोयीची टाळाटाळ करणें सोपें आहे. पण ती खपवून घेतां कामा नये. म्हणूनच पुनः एकदा सर्व अर्थवेत्त्यांना, जाणकारांना माझी अशी कळकळीची विनंति आहे की त्यांनी आतां मराठी परिभाषा निश्चित करावी. त्यासाठी तिन्ही मराठी विद्यापीठांनी पुढाकार घ्यावा.

– सुरेख पंडित








**अनन्ताचा अन्त**

रा. रा. संपादक, नवभारत यांस —

कोणत्याहि वादविवादांत परस्पराला समजून घेण्याची प्रवृत्ति नसली तर मूळ विषयापासून वादकर्ते कसे वाहवत जातात हें प्रा. शहांचें पत्र वाचून दिसून आलें. ज्या गोष्टी ( मी मांडलेल्या ) सहज समजण्यासारख्या आहेत त्याबद्दल देखील जर कोणी गैरसमज करून घेऊं लागला तर त्यानें बुद्धिपुरस्सर गैरसमज केला असें म्हणणें तोंडसुख घेतल्यासारखें होतें काय ? या बुद्धिपुरस्सर गैरसमजाचें नवम्बरच्या शहांच्या पत्रांतलेंच एक उदाहरण पहा : 'वैयक्तिक स्वरूपाचा गैरसमज करून घेऊं नये' अशी प्रस्तावना करून श्री. शहा म्हणतात कीं, "एकदी व्यक्ति गणिताच्या तात्त्विक अधिष्ठानाबद्दल बोलण्यास अधिकारी आहे किंवा नाही ... हें ती व्यक्ति एके काळीं गणित शिकवित होती ...... इत्यादि गोष्टीवरून ठरणार नाही.' हें विधान माझ्या मागील पत्रांतील 'प्राथमिक बीजगणितांच्या माझ्या अज्ञानाबद्दल श्री. वऱ्हाडपांड्यांनी जें सुचविलें आहे त्यावर इतकेंच लिहिलें तर पुरें होईल कीं मीं पूर्वी उच्च गणितहि शिकविलें आहे..." या विधानाला उद्देशून आहे. या उताऱ्यांतून किंवा त्याच्या संदर्भांतून कुठेंहि असें ध्वनित होतें कां कीं माझ्या मतें या अवांतर गोष्टीवरूनच माझ्या कथनाची सत्यासत्यता पारखली जावी ? मीं स्वतःच्या मताच्या पुष्ट्यर्थ कांहीं तर्कहि मांडले होते. त्यांच्यापैकीं एकाचाहि परामर्श न घेतां वरील समज देण्याचें काय कारण होतें ? असो. मी शहांच्या विनंतीला अनुसरून या गोष्टीकडे दुर्लक्ष करावयास तयार आहे. पण मग त्यांनाहि माझी अशी विनंती आहे कीं त्यांच्या या पत्रांत ध्वनित होणारी Attitude of injured innocence सोडावी व हिन्दु सांस्कृतिक परंपरेवर कोणी कांहीं बोलूंच नये असें माझें मत कल्पून माझ्यावर दोषारोपण करूं नये. हिन्दू विद्वानांनीच—नागार्जुन, वसुबन्धु इ०-इतर हिन्दू विद्वानांवर कडाडून हल्ले चढवले आहेत हें माहीत असतांना वरील सारखें मत मीं काय म्हणून मांडेन ? पण हें जुने आक्षेपकर्ते विद्वान् प्रतिपक्ष्याचें अगोदर म्हणणें चांगल्या तऱ्हेनें समजून घेत असत व मग आक्षेप करीत असत. आजचे विद्वान् प्रतिपक्ष्यानें आक्षेप्य विषयावर कांही म्हटलें तरी आहे काय याची दखल घेण्यासहि तयार नसतात. मला संप्रमाण असें वाटतें व हें मीं पुराव्यानिशी मांडावयास तयार आहे कीं आधुनिक पाश्चात्य तत्त्वज्ञानांत नवे म्हणून जितके विचार पुढें आले बहुतेक ते सगळे विचार या ना त्या प्राचीन हिंदू पंडितांनी आपल्या ग्रंथांत मांडले आहेत, पण आपलें पाश्चात्यप्रेम इतकें उतूं जात असतें कीं आपण हें देखील मान्य करावयास कधी तयार होत नाहीं कीं हिन्दू विद्वानांमध्येंदेखील पाश्चात्यांइतकी विचारशक्ति होती. पण पाश्चात्य व हिंदू यांच्या लिखाणांत एक महत्त्वाचा भेद आहे. ज्या गोष्टीचा निव्वळ शाब्दिक विस्तार करून पाश्चात्य लेखक एकाद्या पुस्तकाचीं तीन चारशें पानें अडवतील त्याच गोष्टीच हिन्दू ग्रंथकार एक दोन पानांतच निरूपण करतील. उदा. श्रीहर्षाचाच खण्डनखण्डखाद्य हा ग्रंथ घ्या. Appearance and Reality, Nature of Existence, Critique of Pure Reason यांसारख्या बृहत्काय पाश्चात्य ग्रंथांतील सगळाचा सगळा विचार कोणत्या ना कोणत्या संदर्भात वरील ग्रंथांत येऊन गेला आहे. इतकेंच नव्हे तर या ग्रंथांतल्या सर्व चुका ( तर्कासंबंधीच्या ) वरील ग्रंथांत टाळल्या गेल्या आहेत. असें असूनहि या पाश्चात्य ग्रंथांवर अक्षरशः हजारों ग्रंथ लिहिलेले सांपडतील व त्यांच्यावर स्तुतिसुमनें उधळलेलीं आढळतील. पण बिचाऱ्या श्रीहर्षाला मात्र त्याच्याच देशवासीयांकडून 'पलायनवादी' 'गूढगुंजनवादी' असें सर्टिफिकिट मिळतें ? केवढा हा दैव दुर्विलास आहे ? रसेलसारख्या त्याच त्या गोष्टीचें वेगवेगळ्या संदर्भांत वेगवेगळ्या शब्दांत चर्वितचर्वण करणाऱ्या आपल्या सुन्दर शैलीमुळें भुरळ पाडणाऱ्या लेखकाचे आपण गोडवे गावे व 'धीरा मदुक्तमपि कीरवदेतदुक्त्वा लोकेषु दिग्विजयकौतुकमातनुध्वम्' असें जगांतल्या सर्व विद्वानांना छाती ठोकून आव्हान देणाऱ्या एका महापंडिताला आपण शिव्या द्याव्या ? व त्या गोष्टीची कोणासहि खंत वाटूं नये ? तर्कशुद्ध आक्षेप करा, श्रीहर्षाचा एक एक मुद्दा घ्या तो खोडून काढा, मग ज्यांनी त्याचा व्यासंग केला आहे तें पुढें सरसावतील. पण असले आडून हल्ले कां ?



अनुक्रमणिका







या पत्रांत मी निर्देशिलेल्या कांहीं लेखाबद्दल 'कोणी विचारीत नसलेले लेख' असा शहांनीं शेरा मारला आहे. त्यांच्या मतें 'कोणी' याचा अर्थ 'स्वतः' असा होत असावा. 'मॉरिस लेजरो विज्' 'मार्गारेट मॅक्डोनाल्ड' इत्यादि लेखक लेखिका कोणी विचारत नसलेले म्हणूनच 'Analysis' सारख्या दार्शनिक नियतकालिकांचे संपादक किंवा मोठे विद्वान् समजले जातात व त्यांसारख्यांचे लेख छापणारें 'Mind' वाचून कचऱ्याच्या पेटींत टाकण्यालायकीचेंच त्रैमासिक असावें ? एखाद्या आग्रहाला बळी पडल्यावर कोणावर कसे वाक्प्रहार करून आपला बचाव करावा लागतो याचें हें प्रत्यक्ष उदाहरण आहे. असो. श्री. शहांच्या मतें मला मान्य असलेले लेखक हे नगण्य असतील. पण मला त्यांचे विचार ग्राह्य व समर्थनीयहि वाटतात. माझें असें स्पष्ट म्हणणें आहे – व पुष्कळांचें आहे – कीं ज्या Implication, Universal Operator, Denoting, class... इ० कल्पनांच्या आधारें रसेलनें गणिताचें तत्त्वज्ञान उपस्थित केलें. त्या कल्पनांचें त्याचें स्पष्टीकरण कांही बाबतींत सपशेल चूक व कांहीं बाबतींत विवाद्य आहे. इतकेंच नव्हे तर रसेलचा तात्त्विक दृष्टिकोनहि चूक आहे. हीं सर्व विधानें सिद्ध करण्याची माझी तयारी आहे. म्हणून कोण लेखक कसा आहे हें बरबर ठरवण्याची कांही गरज नाहीं.

माझें ( अनिर्वचनीय वाद्यांच ) विट्गेन् स्टाइन् इ. लेखकांशीं थोडें थोडें जुळतें असें मी म्हटलें होतें. त्यावरहि शहांनी आक्षेप घेतला आहे. त्यासंबंधी मला इतकेंच म्हणावयाचें आहे कीं तो विषय प्रस्तुत नसल्यामुळें मला त्यांत शिरणें अप्रशस्त वाटेल.

झीनोच्या कोड्यांचें उदाहरण आधुनिक विचारपद्धतीनें सुटण्यासारखें बरोबर नाहीं हें मी मागें लिहिलेलें आहे. मला फिरून निक्षून सांगावयाचें आहे कीं 'गणिताच्या कांटेकोरपणाचा किंवा पद्धतीचा' तत्त्वज्ञानांत यत्किंचित्हि उपयोग होऊं शकत नाही. रसेल व त्यासारख्या विद्वानांनी तात्त्विक प्रश्न सोडवल्याचा निव्वळ आभास उत्पन्न केला आहे. यासाठीं माझ्याजवळ भरपूर तर्क आहेत व यासंबंधी चर्चेचें मी सहर्ष स्वागत करीन. या मताला इतर कोणाचा आधार पाहिजे असल्यास 'Analysis' या संकलनांतील संपादिका मॅक्डोनाल्ड यांच्या Introduction पा. १० मधील खालील वाक्य पहावें–

Russel has staggered in and out of metaphysics inventing all sorts of queer objects and theories to provide bogus 'scientific' solutions to philosophical problems.

'चर्चेच्या इष्ट स्वरूपासंबंधीची माझी कोणती तरी लोकविलक्षण भूमिका आहे असा गैरसमज करून घेऊन या पत्रांत श्री. शहा माझ्याशी वाद घालण्याचें टाळतात. यावर कोणीहि समंजस व्यक्ति जें उत्तर देईल तेंच मीं देत आहे. माझी भूमिका तत्त्वजिज्ञासूचीच आहे. मीं अजून कोणत्याहि विचारसरणीचा पुरस्कर्ता झालेलो नाहीं.

शेवटी श्री. शहांच्या एका चमत्कारिक विधानाचा परामर्श घेऊन हें पत्र मीं संपवतो. शहा गौरवितात ती मंडनमिश्रांची परंपरा कोणती ? आम्हां सर्वांना माहित असलेले मंडनमिश्र हे 'विधिविवेक' 'भावनाविवेक' इ० ग्रंथांचे कर्ते व नंतर सुरेश्वराचार्य म्हणून प्रसिद्धीस आलेले असे विद्वान् होते. यांच्या व इतर भारतीय पंडितांच्या परंपरेंत शहाना कोणता फरक दिसून आला ? असें तर नव्हें कीं मंडनमिश्रांनी आचार्यांशी वाद घातला म्हणून त्यांची परंपरा श्रेष्ठ ? पण मग हें विसरून चालणार नाहीं कीं त्या वादांत मंडनमिश्र परास्त झाले व त्यांनी नंतर आचार्यांचें शिष्यत्व पत्करून वेदान्तावरहि ग्रंथरचना केली. थोडक्यांत, प्राचीन भारतीय विद्वानांची परंपरा ही वरपांगी शब्दप्रामाण्यवादी असली तरी 'अयुक्तं ब्रह्मणाप्युक्तं न ग्राह्यं गुरुगौरवात्' असें निर्भीडपणें म्हणणाऱ्यांची व तसें करून दाखवणाऱ्यांची परंपरा आहे.

—नारायणशास्त्री द्रविड

---











अनुक्रमणिका












अनुक्रमणिका

नवभारताचे निर्माते

# आदर्श शिक्षणदानाची
## पवित्र पाऊलवाट दाखवीत आहेत



आदर्श शिक्षक म्हणून १९५९ चा राष्ट्रीय पुरस्कार मिळालेल्या शिक्षकांपैकी श्री. ए. अंबलवाणन् हे एक आहेत. मद्रास राज्याच्या दक्षिण अर्काट जिल्ह्यातील वर्कालपट्टी गावच्या बोर्ड बेसिक स्कूलचे ते मुख्याध्यापक आहेत.

त्यानी शिक्षणक्षेत्रात तीस वर्षे अविरत सेवाकार्य केले आहे. त्यांच्या निरपेक्ष कार्याचे वैशिष्ट्य हे की त्यानी एकेक शिक्षक असणाऱ्या अनेक शाळा स्थापून नंतर अनेक शिक्षकांची गरज लागण्याइतकी त्यांची वाढ केली. आणि विशेष म्हणजे या कामी त्यानी त्या त्या गावच्या लोकांचे स्वयंस्फूर्त सहकार्य यशस्वी रीतीने मिळविले.

शिक्षणप्रसाराच्या कार्यातील या निरलस सेवकाने आपल्या शाळेत मुलांसाठी दुपारच्या जेवणाचीहि सोय केली आहे.

श्री. अंबलवाणन् यांच्यासारखे कर्तव्यतत्पर शिक्षक राष्ट्राच्या प्रगतीचा पाया भक्कम करण्यास — म्हणजेच नवभारत निर्माण करण्यास सहाय्य करीत आहेत.

**यो ज ना म्ह ण जे**
**वि पु ल ता व सु र क्षि त ता**

**तिच्यासाठी कार्य करा - तिच्यासाठी बचत करा**

DA-60/285 MAR

अनुक्रमणिका